






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रम



---

**प्रकाशन :** त्रैमासिक ( जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर )

**संपादन-समिती :** अशोक रा. केळकर ( प्रमुख ), कल्याण काळे, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ ( दूरध्वनी ५२००९ )

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशाचा भरणा :** ए–२ परिमल, १२३९–ए आपटे रस्ता, पुणे ४११ ००४ ( दूरध्वनी ५२००९ )

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.

**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच असे नाही.

या अंकाच्या मुद्रणासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे.

---

**संपादक :** अशोक रा. केळकर / **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी विजया देव / **मुद्रणस्थळ :** संजीव मुद्रणालय, ४६९ सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०



अनुक्रमणिका

# शब्द ! नव्हे, पोकळ वारा

भवभूतीने भाषेचा वापर करणाऱ्या लोकांचे दोन गट कल्पिले आहेत. काही लोक अगोदर मनामध्ये अर्थाचं चिंतन करतात आणि नंतर त्याला शब्दरूप देतात. त्यांच्या बाबतीत वाणी ही अर्थाचं अनुसरण करत असते. हा सर्वसामान्यांचा वर्ग होय. पण श्रेष्ठ ऋषींची गोष्ट वेगळी आहे. ते अगोदर यदृच्छेने वाणीचा उच्चार करतात आणि त्या उच्चारांना नंतर आपोआप अर्थ प्राप्त होतो. भवभूतीने एवढे दोनच प्रकार सांगितले आहेत. अलीकडच्या काळातील भाषाव्यवहार पाहाता आणखी एक वर्ग मानण्याची आवश्यकता वाटू लागते. ही माणसं नुसती बोलत असतात. त्यांच्या बोलण्याच्या अगोदर वा नंतर अर्थाचा संबंध कधी येतच नाही. आपण बोलतो आहोत अथवा लिहितो आहोत याचंच त्यांना समाधान असतं. काय बोलतो आहोत अथवा काय लिहितो आहोत हे जाणून घेण्याची त्यांना पर्वाच नसते.

अलीकडे मराठी लेखकांमध्ये या वर्गातील लोकांची संख्या वाढलेली दिसत आहे. एक प्रसिद्ध समीक्षाग्रंथ चाळत असताना या स्वरूपाच्या लेखनाचे कितीतरी नमुने हाती आले. 'शिरवाडकरांची स्वभावने म्हणजे जळत्या जीवनमार्गाला व मृत्यूकडे झेपावणाऱ्या अलौकिक माणसांचा पुरुषार्थपूर्ण जीवनभोग होय.' 'मनात कोंदाटणाऱ्या अशब्दाला शब्द आणि निराकाराला आकार गडकरी, बालकवी यांच्या संस्कारांतून शिरवाडकरांच्या शब्दकलेला आणि अनुभव घेण्याच्या पद्धतीला, तिच्या आविष्काराला आणि रूपसिद्धीला प्राप्त झाली आहे.' 'हे जनजागरण, ही जागृती, ही गर्जना वांझ नाही तर तिच्यासह जीवाचे मोल देऊन ती जिवंत जागती ठेवली आहे.' 'कालरूपी प्रस्तरावर कोरलेला स्वातंत्र्याचा शिलालेख म्हणजे जणू 'गर्जा जयजयकार' ही कविता.' 'तिचा घाटही वेगळा आणि आविष्कारही रूप घेऊ बघणारा असा.' इ. पुस्तकांच्या पानोपानी अशी उदाहरणं विखुरलेली आहेत. याच पुस्तकाच्या बाबतीत असा प्रकार आढळतो असं नाही. तर मराठीतील कित्येक नामवंतांच्या लेखनात हा प्रकार दिसून येऊ लागला आहे. मराठीतील एक मान्यवर समीक्षक प्रा. गंगाधर पाटील यांनी पुण्यात नुकत्याच दिलेल्या एका व्याख्यानामध्ये अनेक समीक्षकांच्या मान्यताप्राप्त– त्यात कित्येक बक्षीसपात्रही होते– ग्रंथांतून अशा प्रकारची कितीतरी वाक्यं उद्धृत केली होती. हे लेखन केवळ मुद्रणदोषामुळे अथवा नजरचुकीने झालेलं आहे असं म्हणता येण्यासारखी परिस्थिती नाही. अशा लेखनाची संख्या व पुनरावृत्ती पाहाता त्यांचा संबंध लेखकाच्या अंगभूत त्रुटींशी पोहोचतो.

हा प्रकार फक्त समीक्षात्मक लेखनातच आढळतो असं नाही. इतर विषयांच्या लेखनातसुद्धा तो आढळतो. सार्वजनिक व्यासपीठावर केलेल्या भाषणातही तो आढळतो, तसा प्राध्यापकांच्या भाषणातही आढळतो. बराच मोठा भाषाव्यवहार अशा निरर्थक पोकळ वाक्यांनी भरलेला दिसून येतो.

आपल्या नित्याच्या भाषाव्यवहारात अनेक ठिकाणी, अनेक प्रकारे अशा निरर्थक पोकळ रचना आढळून येतात. अनेक वेळा आपण भाषेचा केवळ उपचार म्हणून वापर करतो. पत्रातील मायने, औपचारिक अभिवादनाचे प्रकार, आभार-प्रदर्शनाची भाषणं इ. प्रसंगी वापरलेल्या प्रत्येक शब्दाचा अर्थ अभिप्रेत नसतो. केवळ उपचार म्हणूनच तिथे शब्द वापरले जातात. दुसरा प्रकार एखाद्या उक्तीच्या वारंवार होणाऱ्या पुनरावृत्तीतून जन्माला येतो. शब्द वापरून वापरून गुळगुळीत गोटे होतात ही मर्ढेकरांची तक्रार असल्या उक्तींना लागू पडते. अध्यापकच्या अनुकरणातूनही अशी पोकळ अभिव्यक्ती संभवते. दुसऱ्याचं अनुकरण करताना गाभ्याचा भाग निसटून जातो आणि बाह्य लकबींचं तेवढं अनुकरण होतं. त्यामुळे निरर्थक शब्दप्रयोग जन्माला येतात. कित्येक वेळा पांडित्यप्रचुर शब्दांचा वापर करून पांडित्याचा आभास निर्माण केला जातो. त्यातून खडाष्टकातील वक्रतुंडाच्या पद्धतीचें आचरट विनोदही होतात. पण त्याचं भान त्यांच्या जनकांना नसतं. यातला आणखी एक प्रकार असा की, विषयावर प्रभुत्व न मिळवता, चिंतनाने तो विषय आत्मसात न करता, त्याच्यावर बोलायचा अथवा लिहायचा हव्यास बाळगला की, अर्थशून्य बडबड केली जाते. समारंभीय भाषणं, नवख्या प्राध्यापकांनी पुरेशा तयारीअभावी दिलेली व्याख्यानं किंवा नियतकालिकाची पानं भरण्यासाठी केलेलं लेखन या प्रकारांत मोडतं. एकदा प्रसिद्धी मिळाली की, तिच्या लोभापोटी अनुरंजनाच्या पातळीवर विशिष्ट साच्यात माणसं लिहू किंवा बोलू लागली की तेव्हासुद्धा असाच निरर्थकपणा अनुभवास येतो. नावीन्याच्या अभावी तेच तेच दळण टाकलं जातं. तेच तेच शब्दप्रयोग, त्याच त्याच उपमा, तीच तीच आवाहनं, तेच तेच विनोद इत्यादींनी लेखन वा वाचन कंटाळवाणं तर होतंच पण संज्ञापन सामर्थ्यही गमावून बसतं. एखाद्या छोटया आशयाचा विस्तार करून चारपाचशे पानांचा ग्रंथरूप ठोकळा करणारांना आपण त्यात किती निरर्थक प्रलापांची जोड दिलेली असते याची कल्पनाही नसते.

हा पोकळ भाषाव्यवहार पूर्वीच्या काळीही असेल, नाही असं नाही. पण तो चटकन नजरेत भरेल असा आढळून येत नाही. ५०–६० वर्षांपूर्वीचं लेखन पाहू गेलं की स्वच्छ, शुद्ध, प्रसन्न अशा मराठीचं दर्शन घडतं. तसलं मराठी आता ऐकायला किंवा वाचायला मिळणं कठीण होऊन बसलं आहे. लो. टिळक, ना. सी. फडके, श्री. म. माटे, विनोबा भावे, आचार्य अत्रे असे एकाहून एक वरचढ शैली-

कार लेखक त्या काळात निर्माण झाले. आता शैलीपूर्ण लेखन तर सोडाच पण शुद्ध मराठीसुद्धा वाचायला मिळण्याची वानवा आहे. हीच गोष्ट वक्तृत्वाच्या क्षेत्रातील ऱ्हासाची. आजच्या आपल्या भाषाव्यवहाराचा बराचसा भाग पोकळपणाने व्याप-लेला आहे.

या सर्व प्रकारच्या पोकळपणाच्या मुळाशी चिंतनाचा अभाव हेच मुख्य कारण दिसतं. ज्ञानग्रहण, चिंतन, आत्मसातीकरण आणि आविष्करण या क्रमाने जो आविष्कार होतो तो सकस आणि सखोल असा असतो. पण मधल्या दोन्ही पायऱ्या गाळून केलेला आविष्कार उथळ आणि पोकळ होण्याची शक्यता असते. मिळव-लेल्या ज्ञानावर चिंतन केलं, तो विषय आपलासा केला की त्यावर लिहिताना किंवा बोलताना भाषेचा अडसर वाटत नाही. भाषा वाटेल तशी वाकवता येते. मग अभिव्यक्तीसाठी शब्द शोधण्याचा खटाटोप करावा लागत नाही. शब्द कसे नम्र सेवकांप्रमाणे एकामागून एक मनात उतरत जातात. आणि त्यांच्याद्वारे सुंदर विचारांची अभिव्यक्ती होत जाते. ज्याचं विषयावर प्रभुत्व नसतं त्याला चांगले शब्द सापडत नाहीत. मग बोजड, पोकळ शब्द वापरण्याची पाळी येते.

आज सुबोध, सुंदर लेखन अथवा भाषण दुर्मिळ होत चाललं आहे, या म्हणण्या-मागे वर्तमानकाळाशी जुळवून घेता न येणाऱ्या व त्यामुळे गतकाळाबद्दल भावूक आत्मीयतेने बोलणाऱ्या कुरकुऱ्या म्हाताऱ्याची वृत्ती नाही, तर तशी वस्तुस्थितीच दिसते आहे. सध्या ज्ञानाचा विस्फोट सर्व बाजूंनी, सर्व क्षेत्रांत होत आहे. यातलं बरंचसं ज्ञान आपण आयातच करत आलेलो आहोत. वर्तमानाच्या गतिमान रेटया-मुळे ह्या ज्ञानाचं वितरण करणं आपल्याला अपरिहार्य झालं आहे. पण वितरण करण्यासाठी आवश्यक ती फुरसत, शिस्त यांचा आपल्याकडे अभाव आहे. पुस्तकांची भाषांतरं करायची तर हाताशी योग्य परिभाषा तयार नाही. मग घिसाडघाईने शब्द पाडायचे व लेखन करायचं असा प्रकार ज्ञानशाखात आढळून येत आहे. निश्चित केलेली परिभाषासुद्धा सुसंगतपणे वापरण्याची दक्षता घेतली जात नाही. पुस्तकातील ज्ञान पुरेसं पचनी न पडताच, त्यावर स्वत्वाचे संस्कार न होताच बाहेर टाकावं लागत आहे. त्यामुळे क्लिष्टता, निरर्थकपणा इ. दोष अपरिहार्यपणे येत आहेत. ज्ञानग्रहण करायला, त्यावर मननाचे, चिंतनाचे संस्कार करायला, आपल्या स्वत्वाची पुटं त्यावर चढवायला जी फुरसत लागते ती आपल्याला मिळे-नाशी झाली आहे. आकाशवाणी, दूरचित्रवाणी, राजकारणी वर्तमानपत्रं यांसारख्या प्रसारमाध्यमांचं आपल्या अमूल्य वेळेवर अहर्निश आक्रमण होत आहे. अशा परिस्थितीत वेळ मारून नेण्याशिवाय गत्यंतर उरत नाही. मग आपण काय लिहितो, काय बोलतो, याचं भान सुटलं तर नवल नाहीं. सर्वांचं मूळ मनन, चिंतन, यांचा अभाव हेच आहे. काहीजणांना त्याचं महत्त्व कळत नाही. काहीजणांना त्यांची

आवश्यकताच वाटत नाही. काहीजणांना तेवढी फुरसतच मिळत नाही. या सर्वांना रिक्षामध्ये लिहिल्या जाणाऱ्या एका बोधवचनाची आठवण करून द्यावीशी वाटते, " काही बोलण्यापूर्वी दोन मिनिटं विचार करा आणि मगच बोला. "

कल्याण काळे

पुढील वाक्यांचे नीट निरीक्षण करा व काय समजते ते पाहा.

" कादंबरी – वस्तुनिष्ठ कथनपद्धती असलेली 'दुर्दम्य'सारखी कादंबरी – नाटक, प्रवासवर्णन, प्रासंगिक लेखमाला, समीक्षा–बालवाङ्मय यासारखें वाङ्मय-प्रकार त्यानी (गंगाधर गाडगीळ यांनी) एका मागोमाग एक हाताळले; पण प्रवासवर्णन व काही प्रमाणात समीक्षा वगळता यापैकी कोणत्याही साहित्य-प्रकाराच्या मूळ कोंभावर त्यांच्या संजीवक प्रतिभेचा किरण पडला आणि त्या प्रकाराने नवचैतन्य व स्वरूप घेतले असे घडले नाही. "

"... यावरून लघुकथा या स्वतंत्र वाङ्मयप्रकाराची आपली जाण किती प्राथमिक स्वरूपाची होती हे कळून चुकते. काणेकरांसारखे 'लाल ताऱ्या'ची भुरळ पडलेले साहित्यदेखील तसे वाङ्मयीन आकलनाच्या दृष्टीवे 'धुक्या'तच होते असे म्हणावे लागते... खांडेकरांच्या 'फाटका शर्ट', 'जळालेला मोहर' यांसारख्या कथा ध्यानात राहिल्या. "

" संतचरित्रकथानिर्मितीमागे जी लोकप्रवृत्ती आदिम जीवनधारणांचे प्रोक्षण करीत आलेली आहे, तीच प्रवृत्ती अवतारी महात्म्यांच्या जीवनघटितांत कार्यरत असलेली दिसून येतें. "

" दासोपंतांच्या ग्रंथात मराठी भाषेचा अभिमान ओतप्रोत भरला आहे. मात्र संस्कृतातील 'घट, पाषाण' इत्यादी शब्दांना मराठीत अनेक पर्याय आहेत. "

" (ज्ञानेश्वरांनी) तिला (वारकरी पंथाच्या संघटनेला) तत्त्वविचारांचे भक्कम पाठबळ दिले आणि सदाचार व नीतिमीमांसा करून लोकजागृतीचे वाण सर्व संत कवींनी ज्ञानेश्वरांच्या पावलावर पाऊल टाकून स्वीकारले. "





अनुक्रमणिका

# महाराष्ट्र राज्य शिक्षणक्षेत्रातील मराठी आणि इतर भाषांचे स्थान : एक टिपण

अशोक रा. केळकर

**संदर्भ :** महाराष्ट्र राज्याचे मुख्यमंत्री यांनी पुणे मुक्कामी शनिवार दि. २३–९–१९८९ ला 'महाराष्ट्र राज्य शिक्षणक्षेत्रातील मराठी भाषेचे स्थान' या विषयावर चर्चा करण्यासाठी बोलावलेली काही विचारवंतांची बैठक आणि त्या बैठकीसमोर ठेवण्यासाठी आगाऊ प्रसारित केलेली तीन टिपणें.

**प्रस्तुत टिपणाचे स्वरूप :** प्रथम प्रस्तुत संदर्भात काही सर्वसामान्य स्वरूपाचीं निरीक्षणे नोंदवली आहेत. नंतर शिक्षणक्षेत्रातील मराठी व इतर भाषांचे स्थान निश्चित करण्याविषयीची एक योजना थोडक्यात सादर केली आहे. शेवटी ही योजना इष्ट कशी आहे आणि ती व्यवहार्य कशी करता येईल याबद्दलचे विवेचन केले आहे.

**काही सर्वसामान्य स्वरूपाची निरीक्षणें :** बैठकीचा विषय आणि बैठकीसमोर ठेवलेली तीन टिपणे यांच्या संदर्भात ही निरीक्षणे नोंदवली आहेत.

(१) टिपण क्रमांक १ मध्ये पान २ वर 'आजच्या शिक्षणपद्धतीप्रमाणे पूर्व-प्राथमिकपासून माध्यमिक शाळेतही पाचवी ते दहावी या सर्व इयत्तांचा अभ्यासक्रम मराठी विषय न घेता पुरा करता येतो' असे विधान आहे. टिपण क्रमांक ३ मध्ये पान १ वर 'इ. ५ वी ते ७ वी ही तीन वर्षे विद्यार्थ्याला मराठीचे अध्ययन पूर्ण विषय किंवा संयुक्त स्वरूपात अनिवार्य विषय म्हणून करावे लागते' असे अगदी उलट असे विधान आहे. वस्तुस्थिती अशी दिसते की टिपण क्रमांक ३ ला जोडलेली तालिका पाहता वरीलपैकी दुसरे विधान प्रशासकीय पातळीवर बरोबर आहे, पण मराठी माध्यमाच्या शाळा सोडता इतर शाळांतून ५ वी तें ७ वी मधील मराठी दुसरी भाषा या विषयाकडे गंभीरपणे पाहिले जात नाही. कारण ८ वी ते १० वी आणि शालांत परीक्षेत तो विषय टाळता येतो आणि टाळला जातोही. तेव्हा टिपण क्रमांक १ मधले विधान शब्दशः खरे नसले तरी वस्तुस्थितीपासून फारसे दूर नाही.

(२) टिपण क्रमांक ३ मध्ये पान १ वर 'विद्यार्थ्यांनी कोणत्या माध्यमातून शिकावे हें सर्वस्वी पालकाच्या निवडीवर निर्भर असते' असे विधान आहे आणि भारतीय संविधान कलम २९ (२) आणि ३० (२) यांचा आधार दिलेला आहे. पण हे सर्वस्वी खरें नाही. संबंधित कलमे अशी आहेत–

'29 Protection of interests of minorities...

(2) No citizen shall be denied admission into any educational institution maintained by the State or receiving aid out of State funds on grounds only of religion, race, caste, language or any of them.'

'30 Rights of minorities to establish and administer educational institutions...

(1) All minorities, whether based on religion or language, shall have the right to establish and administer educational institution of their choice. (2) The state shall not, in granting aid to educational institutions, discriminate against any educational institution on the ground that it is under the management of a minority, whether based on religion or language.'

या कलमांचा ढोबळपणे अर्थ लावला तरी माध्यम केवळ पालकानेच निवडायचे आहे, किंवा या शाळांचा शिक्षणक्रम ठरवण्याचा अधिकार अल्पसंख्यांकांना आहे असा अर्थ निघत नाही. फार तर मातृभाषेतून किंवा राज्याच्या भाषेतून शिक्षण घेण्याची सक्ती करणे रास्त दिसत नाही एवढाच अर्थ निघेल. टिपण ३ चा जो एकंदर रोख दिसतो की ज्याची मातृभाषा इंग्रजी नाही अशा विद्यार्थ्याला इंग्रजीच्या माध्यमातूनच सुरुवातीपासून शिक्षण मिळावे असा पालकाने हेका धरला तर त्याला संविधानाचे संरक्षण आहे आणि म्हणून सध्याची सुरुवातीपासून इंग्रजी माध्यम मिळण्याची तरतूद बदलू नये. याला ना संविधानाचा आधार आहे, ना सामान्य न्यायबुद्धीचा आधार आहे (जी भाषा विद्यार्थ्याला 'अगा येतचि नाही' तिच्यातून त्याने इतर विषय शिकायचे हा त्याच्यावरं धडधडीत अन्याय आहे), ना शैक्षणिक औचित्याचा आधार आहे (फ्रॉम वन अन्नोन टू अनदर अन्नोन हे कुठलं औचित्य ?)

या तुलनेत टिपण क्रमांक १ वर सुचवलेला बदल (पूर्वप्राथमिक व प्राथमिक शिक्षणात इंग्रजी हा फार तर विषय म्हणून ठेवावा. पण माध्यम म्हणून अजिबात राहू देऊ नये) रास्त आणि सध्याच्या विपरीत अवस्थेशी जरुरीपुरतेच मिळवून घेणारा म्हणून व्यवहार्य वाटतो.

याच संदर्भात टिपण क्रमांक १ पान १ वरचे पुढील विधान– 'शिक्षणप्रणालीमध्ये के. जी. ही आवश्यक पायरी नसल्यामुळे या स्तरावर मराठी आवश्यक ठेवण्याबाबत विचार करणं आवश्यक नाही'– प्रशासकीय बचाव म्हणून ठीक आहे, परंतु शैक्षणिक धोरण म्हणून योग्य नाही. सध्या प्राथमिक शाळेत इंग्रजी

माध्यमाकडे जाणारा लोंढा थोपवू नका हो एवढाच त्या बचावाचा अर्थ दिसतो. ( **मराठी जगत्** या पुस्तकातील १३ वरचा तक्ता क्र. ६ बोलका आहे. )

(३) शिक्षण व्यवस्थेमध्ये मराठीचे स्थान ठरवताना इतर भाषांचे स्थान काय याचा जरूर तो विचार या बैठकीत करावाच लागेल. नाही तर मराठीचे स्थान ठरवताच येणार नाही. शैक्षणिक कालावधी आणि संसाधने ही अखेर अमर्याद नसतात.

(४) शिक्षणव्यवस्थेत कोणत्याही भाषेचे स्थान याच प्रकारचे असू शकतें :

(क) ज्ञानग्रहणाचे प्रमुख माध्यम म्हणून (वर्गामधला व्यवहार, परीक्षा–चाचण्या आणि वाचन यांचे माध्यम)

(ख) ज्ञानग्रहणाचे पुरवणी माध्यम म्हणून (उदाहरणार्थ, मराठी प्रमुख माध्यम असले तरी इंग्रजी पुस्तकेही शिवाय वाचून घेणे किंवा या उलट)

(ग) संस्कारमाध्यम म्हणून (पूर्वप्राथमिक आणि कनिष्ठ महाविद्यालय या अवस्थांमध्ये याचा विशेष विचार करावा लागेल.)

(घ) आवश्यक नैपुण्यविषय म्हणून (विशिष्ट अवस्थेत एक, दोन, तीन भाषा स्वभाषा म्हणून किंवा परभाषा म्हणून शिकणे आवश्यक ठरवले जाते)

(ङ) ऐच्छिक नैपुण्यविषय म्हणून (आवश्यक भाषाविषय बाजूला ठेवल्या-वर उरलेल्या विषयांपैकी एक म्हणून काही विद्यार्थ्यांना एखादी भाषा ऐच्छिक विषय म्हणून शिकण्याची सोय उपलब्ध करता येईल.)

प्रचलित शिक्षणव्यवस्थेत पुरवणी ज्ञानग्रहणमाध्यमाचा व संस्कारमाध्यमाचा विचार पुरेसा केला गेलेला नाही. तसेच ऐच्छिक भाषाविषय हा पर्याय टाळला आहे. परंतु ऐच्छिक विषय हा पर्याय टाळता येत नाही ही जाणीव झाल्यामुळे त्रिभाषा-सूत्राच्या चौकटीत चवथी भाषा संयुक्तभाषा या नावाखाली कुठेकुठे कोंबण्यात आली आहे. असे करण्यापेक्षा चवथी भाषा एक ऐच्छिक विषय म्हणून आणणे शैक्षणिक-दृष्टचा उचित ठरेल. कारण–

(क) तिला शैक्षणिक न्याय देता येईल – संयुक्त भाषा या प्रकारात दोन्ही भाषांची आबाळ होते हा नेहमीचा अनुभव आहे,

(ख) काही विद्यार्थ्यांचा कल भाषा शिकण्याकडे असतो आणि त्या विद्या-र्थ्यांना त्या तशा शिकणे जड वाटत नाही – मात्र एकाच वेळी दोनपेक्षा अधिक भाषा नव्याने सुरू करायच्या नाहीत एवढे शैक्षणिक पथ्य पाळले म्हणजे झाले.

(५) टिपण क्रमांक २ मध्ये मुख्यत: विद्यापीठीय शिक्षणकार्याचा विचार आहे. हे योग्यच आहे. कारण शालेय व विद्यापीठीय शिक्षण परस्परावर अवलंबून असतात. किंबहुना ती दोन्ही मिळून एकसंध प्रक्रिया असावी. नाही तर दोन्ही

कार्ये कच्ची राहतात.

(६) कोणताही विषय एकदा पाठ्यक्रमात समाविष्ट केल्यावर त्याला दुय्यम नागरिकत्वाची वागणूक मिळू नये. इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून मराठी विषयाला आणि बऱ्याच मराठी माध्यमाच्या शाळांतून इंग्रजी विषयाला अशी वागणूक मिळते हे कटु सत्य आहे. ते टाळण्यासाठी प्रभावी उपाय विचारपूर्वक योजावे लागतील. नुसते आदेश काढून किंवा कोरडा उपदेश करून किंवा जादा गुणांची भीक घालून होणारे हे काम नाही.

(७) सगळ्या विषयांना सारखी वागणूक मिळणे याचा अर्थ स्वभाषा आणि विविध परभाषा एकाच मापाने मोजणे असा अर्थातच नाही. उदाहरणार्थ, गुजराती किंवा मराठी स्वभाषा म्हणून शिकणे आणि परभाषा म्हणून शिकणे यासाठी वेगळे पाठ्यक्रम आणि वेगळ्या अध्यापनपद्धती योजाव्या लागतील. आज मराठीच्या बाबतीत तसे नेहमीच होतें असे दिसत नाही आणि काही मराठी भाषक मुलांनी ऐच्छिक विषय म्हणून गुजराती भाषा परभाषा पातळीवर शिकावी ह्या कोठारी आयोगाच्या शिफारसींना अनुसरणाऱ्या विचारांपासून तर सध्याची शिक्षणपद्धती अनेक योजने दूर आहे ! (मराठी भाषक मुलाने गुणांच्या भरतीपुरते जर्मन शिकून ते विसरून जाण्यापेक्षा त्याने गुजराती किंवा बांगला किंवा कन्नड शिकणे नक्कीच अधिक अर्थपूर्ण ठरेल.) याच विचाराचा आणखी पाठपुरावा केला तर इंग्रजी स्वभाषा म्हणून शिकणारे अगदी अल्पसंख्य विद्यार्थी आणि इंग्रजी परभाषा म्हणून शिकणारे विद्यार्थी यांना सध्या इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधून एकाच मापाने मोजले जाते. विशेषतः अगदी वयाच्या तिसऱ्या-चवथ्या वर्षापासून मोजले जाते. हा शैक्षणिक अत्याचार आहे असेच अगदी तटस्थपणे विचार केला तरी नोंदवावे लागेल.

(८) शिक्षणव्यवस्थेमध्ये विद्यार्थी हा केंद्रबिंदू धरला जाईल हे अत्यंत योग्य असे आश्वासन नव्या शैक्षणिक धोरणामध्ये दिले गेले ही आनंदाची गोष्ट आहे. पण हा आश्वासनाचा चेक वटवून कसा घ्यायचा याचा विचार झाला नाही तर या आनंदाची जागा खिन्नता घेईल. विद्यार्थी हा केंद्रबिंदू धरायचा तर कमीत कमी पुढील गोष्टी कराव्या लागतील–

(क) विद्यार्थ्यांच्या क्षमतेपेक्षा त्याच्यावर जास्त भार टाकू नये– विशेषतः सामान्य विद्यार्थ्यांच्या क्षमतेपेक्षा.

(ख) विद्यार्थ्यांच्या क्षमतेपेक्षा त्याच्यावर कमी भार टाकू नये– विशेषतः गुणवंत विद्यार्थ्यांची बौद्धिक भूक मारू नये.

(ग) विद्यार्थ्यांचे भवितव्य कसे सुघड होईल याचा शिक्षणपद्धतीत विचार व्हावा– शैक्षणिक तडजोडी किंवा शैक्षणिक दुराग्रह यांच्यापायी





अनुक्रमणिका

विद्यार्थ्यांचे भवितव्य गहाण टाकण्याचा अधिकार पालकालाही नाही, शिक्षणकर्त्याला तर नाहीच नाही.

ही तीन सूत्रे एकत्र केली तर शैक्षणिक व्यवहारवाद आणि शैक्षणिक आदर्शवाद यांची निरगाठ अगदी पक्की बसते. (ज्या संविधानाची साक्ष आपण काढली होती. त्यातही राजकीय व्यवहारवाद आणि राजकीय आदर्शवाद यांची अशीच गाठ घातलेली आहे– मात्र संविधान शहाणपणाने राबवले तरच ती गाठ पक्की होईल.)

**शिक्षणव्यवस्थेत भाषांचे स्थान माध्यम म्हणून आणि विषय म्हणून निश्चित करण्यासाठी एक योजना :**

ही योजना साहजिकच आतापर्यंत जी सर्वसामान्य निरीक्षणे नोंदवली आहेत. त्यांच्या संदर्भात पहावी लागेल.

(१) पूर्वप्राथमिक अवस्था (दोन किंवा तीन वर्षे) : इथे मोंतेस्सोरी आणि फ्रोबेल यांना इमानाने स्मरून सांगायचे असेल आणि पूर्वप्राथमिक शाळेचा कोचिंग क्लास बनवायचा नसेल तर प्रमुख शैक्षणिक माध्यम क्रीडा हेच राहील. स्वभाषा केवळ ज्ञानग्रहणाचे पुरवणी माध्यम राहील कोणतीही भाषा हा आवश्यक किंवा ऐच्छिक विषय म्हणून राहणार नाही – अगदी स्वभाषादेखील नाही. इंग्रजीसारखी परभाषा तर नाहीच नाही.

टीप : आतापर्यंत आपण मातृभाषा हा शब्द न वापरता स्वभाषा हा शब्द का वापरला आहे हे या ठिकाणी स्पष्ट करणे उचित होईल. मातृभाषा म्हणजे अगदी पहिले बोबडे बोल ज्या भाषेत मूल बोलते ती भाषा, स्वभाषा म्हणजे बोलणारी व्यक्ती जी भाषा बिनधास्तपणे आणि न चुकता बोलू शकते ती भाषा. सामान्यतः दोन्ही एकच असतील अशी अपेक्षा. पण ती नेहमीच पुरी होत नाही. उदाहरणार्थ, माझ्या शेजारीच मराठी भाषक् कुटुंबातली पण सुरवातीपासून इंग्रजी माध्यमात शिकणारी काही मुले अशी आहेत की मराठी त्यांची मातृभाषा आहे, पण स्वभाषा नाही. मग इंग्रजी त्यांची स्वभाषा आहे का ? काहींची आहे, पण काहींची ती चवदा-पंधरा वर्षे वयातही परभाषा राहिली आहे आणि तीही अगदी कमी कसाचे नैपुण्य मिळवून. त्यांना स्वभाषाच नाही. जीवदयामंडळापुढे खरे तर त्यांना उभे करायला पाहिजे. माझ्या शेजारी राजस्थानी भाषक कुटुंबातली काही मुले आहेत. त्यांपैकी काहींना एक मातृभाषा आहे – राजस्थानी, पण लहानपणापासून दोन स्वभाषा आहेत – राजस्थानी आणि मराठी. काळजीपूर्वक आणि तटस्थपणाने निरीक्षण केले तर आणखीही काही पर्याय आढळतील – उदाहरणार्थ, दोन मातृ-भाषा आणि एक स्वभाषा. (मात्र मातृभाषा हा समास मातेची भाषा असा सोडवला नाही म्हणजे झाले; नाही तरी तो समास मूळचा इंग्रजी समासच आहे.)

(२) प्राथमिक अवस्था (पहिली ते चवथी) : या ठिकाणी दोन प्रकारच्या

शाळा असतील किंवा अधिक नेमके सांगायचे तर दोन शैक्षणिक प्रवाह (स्ट्रीम्ज) राहतील – एक, एकभाषिक प्रवाह, दुसरा मिश्र प्रवाह.

(क) एकभाषिक प्रवाह : शैक्षणिक माध्यम स्वभाषा राहील. आवश्यक भाषाविषय म्हणूनही तीच भाषा राहील. ऐच्छिक भाषा असणार नाही.

(ख) मिश्र प्रवाह : शैक्षणिक माध्यम स्वभाषा राहील. आवश्यक भाषाविषय म्हणून दोन असतील –

पहिली ते चवथी : स्वभाषा

तिसरी व चवथी : प्रादेशिक भाषा किंवा हिंदी किंवा इंग्रजी.

मात्र स्वभाषा आणि प्रादेशिक भाषा एकच असली तर तिसरी-चवथीसाठी दुसरी भाषा म्हणून प्रादेशिक भाषा हा पर्याय राहणार नाही.

(३) माध्यमिक अवस्था (पाचवी ते दहावी) : चवथीतून पाचवीत जाताना अपवाद म्हणून प्रवाह बदलायची सोय असावी. अर्थात हा अपवाद विद्यार्थ्यांची क्षमता आणि भवितव्य लक्षात घेऊनच द्यायचा, कुणाची लहर म्हणून नाही.

(क) एकभाषिक प्रवाह : शैक्षणिक माध्यम स्वभाषा राहील. आवश्यक भाषाविषय म्हणून तीन असतील. पर्यायांची आखणी मुद्दाम लवचिक ठेवली आहे.

पहिली भाषा : स्वभाषा

दुसरी भाषा : प्रादेशिक भाषा किंवा इंग्रजी किंवा हिंदी

तिसरी भाषा : प्रादेशिक भाषा किंवा इंग्रजी किंवा हिंदी.

दोन गोष्टी लक्षात ठेवायच्या. एक म्हणजे एकच भाषा दोन किंवा तीन ठिकाणी घेता येणार नाही. दुसरी म्हणजे कोणतीही भाषा ज्या कप्प्यात पडेल त्याप्रमाणे तिचा पाठ्यक्रम बदलेल. उदाहरणार्थ इंग्रजी दुसरी भाषा आणि इंग्रजी तिसरी भाषा यांचे पाठ्यक्रम वेगळे राहतील. ऐच्छिक भाषाविषय म्हणून आठवी ते दहावीत चवथी भाषा घेता येईल. अर्थात बरीच मुले चवथी भाषा न घेता दुसरा कोणता विषय घेतील.

चवथी भाषा : अभिजात भाषा किंवा आधुनिक भारतीय परभाषा.

दोन गोष्टी लक्षात ठेवायच्या. एक म्हणजे हिंदू विद्यार्थ्यांनीच संस्कृत घ्यायचे किंवा मुस्लिम विद्यार्थ्यांनीच अभिजात फार्सी किंवा अभिजात अरबी किंवा उर्दू घ्यायचे ही व्यावहारिक समीकरणे हळूहळू नाकारत जायचे आहे. दुसरी म्हणजे आधुनिक भारतीय परभाषेची निवड पुष्कळदा स्थलपरत्वे बदलेल. उदाहरणार्थ कोल्हापूरच्या बाजूला कन्नड ही परभाषा म्हणून अधिक पसंत केली जाईल. अर्थात प्रशिक्षित शिक्षकांच्या उपलब्धतेवर ऐच्छिक भाषांची उपलब्धता अवलंबून राहील हे उघड आहे. (केंद्र सरकारच्या विभागीय भाषाकेंद्राचा यासाठी उपयोग करून घेता येईल.)





अनुक्रमणिका

(ख) मिश्र प्रवाह : प्रमुख शैक्षणिक माध्यम स्वभाषा राहील. पुरवणी शैक्षणिक माध्यम म्हणून आठवी ते दहावीत प्रादेशिक भाषा, इंग्रजी, हिंदी यांपैकी कोणतीही एक किंवा कोणत्याही दोन भाषा राहतील. आवश्यक भाषाविषय म्हणून तीन भाषा असतील.

पहिली भाषा : स्वभाषा

दुसरी भाषा : प्रादेशिक भाषा किंवा इंग्रजी किंवा हिंदी

तिसरी भाषा : प्रादेशिक भाषा किंवा इंग्रजी किंवा हिंदी

वर सांगितलेल्या त्याच दोन गोष्टी इथेही लक्षात ठेवायच्या. ऐच्छिक भाषाविषय म्हणून आठवी ते दहावीत काही विद्यार्थी चवथी भाषा घेऊ शकतील.

चवथी भाषा : अभिजात भाषा किंवा आधुनिक भारतीय परभाषा किंवा आधुनिक परदेशी भाषा.

फ्रेंच, जर्मन, रशियन, चिनी – कोणतीही उपलब्ध परदेशी भाषा विद्यार्थ्यांना हौस म्हणून शिकू द्या, गुणांची भर म्हणून नको. त्यांच्या भवितव्याशी ही हौस निगडित होईल असे पहावे. तीच गोष्ट अभिजात भाषांची आणि आधुनिक भारतीय परभाषांची.

(४) उच्चतर माध्यमिक म्हणजेच कनिष्ठ महाविद्यालयीन अवस्था (अकरावी ते बारावी) : इथे दोन शैक्षणिक प्रवाह राहतील – एक मानव्यविद्याकेंद्री प्रवाह आणि दुसरा वाणिज्यविज्ञानकेंद्री प्रवाह.

टीप : फॅकल्टी ऑव्ह आर्टस् याला कलाशास्त्र हा अडाणी शब्दप्रयोग वापरायचे आपण जितक्या लवकर थांबू तितके बरे. लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी सुचवलेला मानव्यविद्याशाखा हा शब्दप्रयोग निश्चितच उचित आणि अर्थपूर्ण आहे. मानव्यविद्याकेंद्री प्रवाहाच्या पाठ्यक्रमात इतर विद्याशाखांनाही थोडी कूस असू दे, आणि वाणिज्यविज्ञानकेंद्री प्रवाहात मानव्यविद्यांनाही थोडी कूस असू दे.

(क) मानव्यविद्याकेंद्री प्रवाह : प्रमुख शैक्षणिक माध्यम विषयानुसार आणि विद्यार्थ्यांच्या क्षमतेनुसार प्रादेशिक भाषा किंवा इंग्रजी पुरवणी शैक्षणिक माध्यम म्हणून इतर भाषांचा उपयोग होईल. आवश्यक भाषाविषय म्हणून दोन विषय राहतील.

व्यावहारिक मराठी
वाङ्मयीन मराठी
व्यावहारिक इंग्रजी
वाङ्मयीन इंग्रजी
व्यावहारिक हिंदी
वाङ्मयीन हिंदी

यांपैकी कोणतेही दोन विषय

मात्र एकच भाषा दोनदा निवडायची नाही आणि दोन्ही भाषा व्यावहारिक पातळीवरच्या निवडायच्या नाहीत. (दोन्ही वाङ्मयीन चालतील.) वाङ्मयीन पातळीवरच्या भाषेचे कार्य संस्कारमाध्यम म्हणून राहील. साहित्याचे अध्ययन हे साध्य नसून साधन आहे. साहजिकच उतारे निवडताना ललित उताऱ्यांबरोबर वैचारिक उतारेही निवडले जातील आणि मूळ त्या भाषेच्या परंपरेतील उताऱ्यांबरोबर अन्य परंपरांमधील उतारेही निवडले जातील (उदाहरणार्थ मराठीसाठी संस्कृत किंवा बांगला मधील अनुवाद, इंग्रजीसाठी अनुवादरूपाने प्लेटोचा संवाद किंवा रूसोचा उतारा किंवा शिलरची कविता किंवा आफ्रिकन/भारतीय लेखकांचे इंग्रजी वाङ्मय.) ऐच्छिक भाषाविषय म्हणून अभिजात भाषा किंवा आधुनिक भारतीय परभाषा किंवा आधुनिक परदेशी भाषा.

(ख) वाणिज्यविज्ञानकेंद्री प्रवाह : वास्तविक हे दोन प्रवाह, पण भाषेच्या संदर्भात एकत्र घेतले आहेत एवढेच. प्रमुख शैक्षणिक माध्यम इंग्रजी राहील. पुरवणी शैक्षणिक माध्यम म्हणून प्रादेशिक भाषा किंवा हिंदी राहील. आवश्यक भाषाविषय म्हणून कोणताही एक भाषाविषय घ्यावा लागेल. त्यासाठी मानव्यविद्याकेंद्री प्रवाहासाठी सांगितलेले तेच सहा पर्याय राहतील. वाङ्मयीन पातळीसाठी उताऱ्यांचे वेचे दोन्ही प्रवाहांसाठी तेच राहतील. विज्ञान आणि वाणिज्य शाखेतील विद्यार्थ्यांची वाङ्मयीन भूक तोकडी असते असे मानायला अनुभवाचा आधार नाही – किंबहुना अनुभवाचा आधार उलटाच आहे. ऐच्छिक भाषाविषय या प्रवाहासाठी ठेवणे सध्यातरी व्यवहार्य वाटत नाही. फार तर व्यावहारिक फ्रेंच/जर्मन/रशियन हे विषय सध्या ठेवता येतील. मात्र वाणिज्यव्यवहार आणि विज्ञानव्यवहार यांचा त्यासाठी वेगळा विचार करावा लागेल.

(५) पदवीपूर्व विद्यापीठीय अवस्था : मानव्यविद्याशाखेत विविध भाषा विशेष अध्ययनाचे ऐच्छिक विषय म्हणून राहतील. शिक्षणविद्याशाखेत बी.एड्. च्या पाठ्यक्रमात मराठीचे स्वभाषा–अध्यापन, मराठीचे परभाषा–अध्यापन, इंग्रजीचे भाषिक अध्यापन, इंग्रजीचे वाङ्मयीन अध्यापन हे वेगळे पर्यायी ऐच्छिक विषय म्हणून ठेवावे लागतील आणि अर्वाचीन परकीय भाषा (फ्रेंच इ.) इंग्रजी माध्यमाप्रमाणेच मराठी माध्यमातदेखील शिकवता येतात ही कल्पना रुजवावी लागेल. आयुर्वेद, भारतीय तत्त्वज्ञान या विषयांसाठी त्या त्या प्रकारची व्यावहारिक संस्कृत या विषयाची तरतूद करावी लागेल. वृत्तविद्या, पशुवैद्यक, कृषी आणि विविध ललितकला या विषयांसाठी मराठी माध्यमाची तरतूद इंग्रजी माध्यमाच्या बरोबरीने करावी लागेल.*

(६) पदव्युत्तर विद्यापीठीय अवस्था : या पातळीवर प्रस्तुत योजनेतील नव्या उपक्रमांसाठी जरूर त्या नव्या संशोधनाला उत्तेजन द्यावे लागेल. मानव्य विद्या-





अनुक्रमणिका

शाखेत विविध भाषा विशेष अध्ययनाचे ऐच्छिक विषय म्हणून राहतील.

(७) तंत्रनिकेतनातील भाषांचे माध्यम आणि विषय म्हणून स्थान : या ठिकाणी मराठीला योग्य ते स्थान मिळेल अशी तरतूद करावी लागेल. केवळ प्रशासकीय तरतूद नव्हे तर व्यावहारिक तरतूद. (पहा : गो. ह. रहाळकर, मराठी भाषेतून विज्ञान, तंत्रज्ञान शिक्षणास कायद्याने बंदी नको, पुणे, खाजगी वितरणासाठी पुस्तिका, १९८८.)

**प्रस्तुत योजना इष्ट आणि व्यवहार्य कशी ?** : वास्तविक या विषयाचे विवेचन सुरुवातीच्या निरीक्षणात आणि योजनेचा तपशील भरताभरताच सुरू केलेले आहे. ती इष्ट का याचा सैद्धांतिक पाया विस्ताराने देण्याचे हे स्थळ नव्हे. त्यासाठी प्रस्तुत लेखकाच्या **वैखरी : भाषा आणि भाषाव्यवहार** (मुंबई १९८३) या पुस्तकातील 'भाषा आणि शिक्षण', 'भारताचे भाषिक प्रश्न', आणि मुख्य म्हणजे 'इंग्लिश व मराठी भाषांचे शिक्षणक्रमात स्थान' हे निबंध जरूर तर पहावे. याशिवाय होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र (मुंबई) याचे संचालक प्राध्यापक वि. गो. कुलकर्णी यांचे संशोधनपर निबंध आणि मराठी विज्ञान परिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेले भाषण पहावे लागेल. आदिवासी विद्यार्थ्यांच्या विशेष भाषिक गरजांबद्दल प्रस्तुत लेखकाचा 'आदिवासींच्या प्रश्नांची भाषिक बाजू' हा निबंध पहावा.

माझ्या विवेचनाचे एक महत्त्वाचे सूत्र थोडक्यात सांगायचे तर असे सांगता येईल. आपल्या मुलांना शिक्षण इंग्रजीच्या माध्यमातून माध्यमिक अवस्थेपासून, नव्हे प्राथमिक अवस्थेपासून, नव्हे पूर्वप्राथमिक अवस्थेपासून कसे मिळेल या भ्रांतीत आपले पालक आहेत. मराठी माध्यमाच्या नामवंत शाळांमधून जरी गेले तरी त्यांना एका न्यूनगंडाने पछाडलेले दिसते. तज्ज्ञ आणि विचारवंत मंडळी ऊर्ध्व बाहू करून यातले धोके सांगत आहेत. तरीदेखील आपला सांस्कृतिक आणि बौद्धिक आत्मघात करून घ्यायचे जणू मराठी जनतेने पक्के ठरवलेले दिसते. सांस्कृतिक आणि बौद्धिक आत्महत्या ही जरा कडक भाषा वाटते खरी, पण ते केवळ एक नेमके वर्णन आहे. पैकी सांस्कृतिक आत्मघाताची शक्यता काही पालकांना अंधूकशी जाणवू लागलेली दिसते. त्यावर भारताचा प्राचीन वारसा इंग्रजी कॉमिक्सच्या द्वारा मुलांपर्यंत पोचवणे, शाळेत 'इंडियन फेस्टिव्हल्ज' वगैरे साजरी करणे

---

* टीप : मराठीच्या विद्यापीठीय ऐच्छिक विशेष अध्ययनाचा शिक्षणक्रम अधिक विद्यार्थी आकर्षित करण्यासाठी पातळ करण्याची प्रवृत्ती हल्ली दिसून येते. परिणामी विद्यार्थी आकृष्ट होत नाहीत. आलेच तर निकृष्ट विद्यार्थी आकृष्ट होतात, उत्कृष्ट विद्यार्थी दूर जातात आणि भावी अध्यापकांचा दर्जा घसरतो.

यांसारखे थातूरमातूर उपाय इथेतिथे चालू आहेत. बौद्धिक आत्मघाताबद्दलची स्थिती आणखीनच वाईट आहे. पूर्वप्राथमिक शिक्षणाचे कार्य घराबाहेरच्या मोठ्या जगाशी मुलाची प्रथम ओळख आणि नंतर दोस्ती करून देणे हे आहे. मुक्त क्रीडा आणि भाषा ही या अवस्थेसाठी संस्कारमाध्यमे आहेत. प्रत्यक्षात पूर्वप्राथमिक शाळा म्हणजे प्राथमिक शाळेत प्रवेश मिळवून देणारे कोचिंग क्लासेस बनल्या आहेत. मुक्त क्रीडेला तिथे जणू मज्जाव असतो आणि भाषाव्यवहार बराचसा एकतर्फी आणि तोही पुष्कळदा न येणाऱ्या परभाषेत असतो. प्राथमिक शाळेत मुलाच्या स्वानुभवाचे आणि एव्हाना आत्मसात् झालेल्या स्वभाषेतून आकार घेणारे विश्व यांचा सांधा जुळावा लागतो. भाषा आणि आकारबद्ध क्रीडा ही त्यासाठी संस्कारमाध्यमे आणि ज्ञानग्रहणमाध्यमे आहेत. प्रत्यक्षात मात्र प्राथमिक शाळांची अवस्था या आदर्शापासून दूर असते. त्यातून इंग्रजी माध्यम असले तर सामाजिक व्यवहाराचे जग आणि शाळेतले जग यांचा संबंध दुरावतो. घरात आई-बापही मुलांशी इंग्रजीत बोलू लागले तर भारतीय जग आणि मुलांच्या भोवतालचा इंडिया याची त्यांच्या मनात फाळणी होते. निम्नमाध्यमिक शाळेत (पाचवी ते सातवी) शिक्षकावर दुहेरी जबाबदारी असते – एक म्हणजे अमूक इतके आवश्यक ज्ञान द्यायचे आणि दुसरी म्हणजे ज्ञान घ्यायची ओढ, आवडी-निवडीची आणि चांगल्या-वाईटाची जाणीव मुलाच्या ठिकाणी जागवणे. भाषा, क्रीडा, आणि कार्यानुभव ही त्यासाठी ज्ञानग्रहणमाध्यमे व संस्कारमाध्यमे आहेत. प्रत्यक्षात प्राथमिक शाळेतील दुरवस्था मागील अंकावरून पुढे चालू राहते. या सगळ्यामुळे मोठी बौद्धिक हानी होते – हुशार विद्यार्थ्यांची तर विशेषच. मध्ययुगीन भारतात ज्ञान-भाषा संस्कृत होती, लोकप्रचलित भाषांमध्ये गद्याची, विशेषत: वैचारिक गद्याची व्हावी तशी वाढ झाली नाही, वाक्ये छोटी छोटी राहिली आणि शब्दचित्र उभे करताकरता त्याच्यामागचे तार्किक आणि कार्यकारणभावाचे संबंध दाखवण्याची क्षमता भाषेत राहिली नाही. परिणामी ज्ञान मूठभर लोकांपुरते मर्यादित राहिले आणि तेही पढीक, स्वानुभवाशी फारकत घेणारे राहिले. या कुचंबणेतून आपला समाज स्वातंत्र्यलढ्याच्या काळात मोठ्या कष्टाने बाहेर पडत होता. माध्यमिक शाळांतून मराठी माध्यम स्थिरावायला १९२५–२६ साल उजाडले. आज तोच समाज संस्कृतच्या बिळातून इंग्रजीच्या बिळात घुसायला उद्युक्त झाला आहे. ज्ञानाची खिडकी म्हणून संस्कृतचे आणि इंग्रजीचे महत्त्व निर्विवाद आहे. पण या खिडक्यांतून पाहणारे डोळे स्वभाषेचेच पाहिजेत, नाही तर (उपमा थोडी बदलायची तर) ज्ञानाचा वाहता झरा नाहीसा होऊन साचलेल्या पाण्याचे डबके तयार होते, ज्ञानाचे रूपांतर माहितीच्या अडगळीत होते. (उगीच नाही क्विझ्टाइम-सारख्या दूरदर्शनवरच्या अशैक्षणिक कार्यक्रमाला अमाप प्रतिष्ठा मिळत ! उगीच

नाही विज्ञानाच्या विद्यार्थ्यांना भाषानैपुण्य आणि वाङ्‌मयरूपी संस्कारमाध्यमं यांची गरज नाही असा गैरसमज बळावत ! उगीच नाही आपल्या पीएच–डी. प्रबंधांची, अगदी विज्ञानशाखेतील पीएच–डी. प्रबंधांचीही, लक्तरे निघत ! उगीच नाही आपल्या प्रज्ञावंतांच्या बुद्धीला पैलू पाडायला परदेशी पाठवावे लागत ! ) ही सांस्कृतिक आणि बौद्धिक आत्महत्या टळली नाही तर आपला देश पुन्हा एकदा वसाहत होईल. कोणतेच विद्यापीठ खऱ्या अर्थाने मुक्त राहणार नाही.

या अरिष्टावर उपाय कोणता ? याबद्दलचे माझे विचार सूत्ररूपाने सांगायचे तर असे सांगता येतील. प्रथम मराठी माध्यमाच्या शाळांमधल्या इंग्रजी अध्यापनाचा दर्जा सुधारला पाहिजे. त्यासाठी उदाहरणार्थ, महाराष्ट्र स्टेट इन्स्टिटयूट ऑव्ह इंग्लिशला बंगलूरच्या ‘ रीजनल इन्स्टिटयूट ऑव्ह इंग्लिश – साउथ इंडिया’चे बळ आणि प्रतिष्ठा प्राप्त करून दिली पाहिजे. (कदाचित् रीजनल इन्स्टिटयूट ऑव्ह इंग्लिश – वेस्ट इंडिया (महाराष्ट्र, गुजरात, मध्यप्रदेश) असा संकल्पही सोडावा लागेल.) नंतर इंग्रजी माध्यमाच्या शाळांमधल्या मराठी स्वभाषा आणि मराठी परभाषा यांच्या अध्यापनाचा दर्जा आणि प्रतिष्ठा उंचावली पाहिजे. आणि तिसरे काम म्हणजे काहीसे संथपणे आणि विद्वत्सुलभ (अकॅडमिक) पद्धतीने काम करणारी पण व्यावहारिक वळणाचे संशोधन (ॲक्शन–ओरिएंटेड रीसर्च) करणारी एक मराठी विकास संस्था निर्माण करायला पाहिजे. आपण लावलेल्या झाडाचे आंबे नातवंडे खातील असे म्हणणारा दूरदर्शीपणा मात्र त्यासाठी पाहिजे. (अशा संस्थेच्या तपशीलवार योजनेसाठी पहा : महाराष्ट्र शासन, शिक्षण रोजगार युवकसेवा विभाग, फाइल क्रमांक एच एस् सी १०७८/५०८१३ – वीस, एकवीस नोव्हेंबर १९७९, किंवा प्रस्तुत लेखकाच्या **वैखरी** या पुस्तकातला ‘ राजभाषावर्षाचे एक फलित ’ हा निबंध.)

ही योजना यशस्वी झाली तर केवळ अरिष्ट टळेल एवढेच नाही तर महाराष्ट्रात खऱ्या अर्थाने भाषिक समता, भाषिक बंधुता, आणि भाषिक स्वाधीनता प्रस्थापित होईल.

अगोदर मांडलेली योजना महत्त्वाकांक्षी तर खरीच पण वास्तवाच्या भूमीवर पाय रोवून उभी राहिलेली आहे असे म्हटले तर ते एव्हाना अतिशयोक्तीचे वाटू नये. ती योजना प्रस्तुत लेखकाने मांडलेली असली तरी अनेक भारतीय आणि पाश्चात्त्य विचारवंतांच्या खांद्यावर ती उभी राहिलेली आहे असे मला नम्रतेने सांगावेसे वाटते.

उघडच आहे की एका सपाटयात ही सर्व योजना कार्यवाहीत आणण्याचा प्रयत्न केला तर लोकांचा मोठा विरोध होईल, पुरेशा पूर्वतयारीच्या अभावी मांडलेले आडाखे फसतील, आणि योजना अकारण बदनाम होईल. उलटपक्षी ती योजना

'ठंडा करके खाओ, क्या जल्दी है ?' या भारतीय पद्धतीने चालली आणि लाल फितीत अडकली आणि सगळ्यांना थोडे थोडे खूष करण्याच्या भरीस पडली तर विनायकाचे वानर व्हायला वेळ लागणार नाही. यासाठी मध्यममार्ग म्हणजे ही योजना क्रमाक्रमाने कार्यान्वित करण्यासाठी एक पंचवार्षिक कार्यक्रम आखायला पाहिजे, प्रत्यक्ष अनुभवानंतर काही चुका लक्षात आल्या तर त्या दुरुस्त करण्याची यंत्रणाही त्या कार्यक्रमातच समाविष्ट करावी लागेल, आणि तिच्या प्रत्येक टप्प्यावर लोकमत अनुकूल करून घेण्यासाठी लोकशिक्षणाचा एक कार्यक्रम आखावा लागेल. वृत्तपत्रे आणि सेवाभावी संस्था यांचाही त्यात सहभाग असेल.

महत्त्वाचा मुद्दा असा आहे की आपल्याला शेवटी कुठे पोचायचे याचा सर्वंकष आराखडा आपल्या डोळ्यांसमोर हवा आणि तिथे कोणत्या टप्प्यांनी पोचायचे आहे याचा सुनिश्चित पंचवार्षिक कार्यक्रम हवा. सध्या एवढी डागडुजी करू मग पुढचे नंतर बघू. या पद्धतीने काम करणे आपल्याला परवडण्यासारखे नाही.

प्रांजलपणाने सांगायचे तर प्रस्तुत बैठकीचे निमंत्रण मला मिळाले तेव्हा मला सुखद का होईना पण जरासा धक्काच बसला. आपल्याकडे विचारवंत आणि समाजातील करती माणसे (मग ती राज्यकर्त्यांपैकी असोत किंवा विरोधी पक्षातील असोत) यांच्यामधला संवादच गेली कित्येक वर्षे हरवलेला आहे. कोणतीही शैक्षणिक योजना आखायची आणि यशस्वी रीतीने राबवायची तर ती केवळ राजकारणी आणि प्रशासक यांच्या हातात जाऊन उपयोगी नाही. विचारवंत आणि शिक्षणक्षेत्रातील विशेषज्ञ यांचा सहभाग त्यात सातत्याने यायला हवा. महाराष्ट्रातील विद्यापीठे आणि संशोधनसंस्था ही देखील आपल्या कामाचा वाटा उचलतील. अगदी व्यावहारिक संस्कृतचा शिक्षणक्रम आखण्यापासून.

(**लेखकाची विनंती** : आपल्याला ही योजना कमीअधिक पटली तर त्याबद्दल मुख्यमंत्र्यांना कळवा. एकएकटे कळवा किंवा त्याहून उत्तम एखादा शिक्षकपालकसंघ, एखादा शिक्षकसंघ, एखादे ज्ञानदीपमंडळ अशा संस्थेतर्फे गटांनी सह्या करून कळवा. आपल्या ओळखीच्या मंडळींच्या नजरेस हा लेख आणा.)

**ए – २ परिमल, १२३९ – ए आपटे रस्ता, पुणे ४११००४, दूरध्वनी ५२००९**

# जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने

गणेश कमलाकर ओक

जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने मराठी भाषेची पीछेहाट, इंग्रजी भाषेची मराठीवर होणारी कुरघोडी या विषयावर बरीच चर्चा झाली. आपल्या मातृभाषेवर प्रेम करणाऱ्या कोणत्याही माणसास तिची पीछेहाट ही गोष्ट निश्चितच असमाधानकारक वाटेल. त्या दृष्टीने ही पीछेहाट कशी थोपविता येईल याचा शोध घेणे हा या 'जागतिक मराठी परिषदे'मागील एक हेतू होता. मराठी मातृभाषा असणाऱ्या पालकांचाही स्वतःच्या पाल्यास इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालण्याकडे कल, दैनंदिन व्यवहारातही इंग्रजी भाषेचा, निदान इंग्रजी शब्दांचा वाढता वापर यांसारख्या गोष्टी मराठी भाषेची पीछेहाट निर्देशित करतात. ही पीछेहाट थांबवायची असेल तर त्यावर काहीतरी उपाय शोधून काढला पाहिजे. पण तत्पूर्वी त्यामागे काय कारणे असू शकतील याचा शोध घेणे आवश्यक आहे त्या दृष्टीने काही मुद्द्यांची चर्चा येथे केली आहे,

अशी चर्चा करण्यापूर्वी एक गोष्ट सांगणे आवश्यक आहे. केवळ मराठी भाषा टिकवायची या अट्टाहासाने उपाय योजले जाणार असतील तर ते कितपत यशस्वी ठरू शकतील ही शंकाच आहे. महाराष्ट्र राज्याच्या राजधानीचे नाव बदलून, ते मुंबई करण्यापासून ते राज्यपातळीवरील आणि राज्यातील माणसांचा जिथे संबंध येतो त्या सर्व बाबतीत मराठी भाषेतून व्यवहार करण्यापर्यंतचे उपाय हे अंमलात आणता येतील. थोडक्यात मराठी भाषेस निदान राज्यपातळीवर शासकीय अधिष्ठान प्राप्त करून देता येईल. परंतु एवढेच पुरेसे नाही. या सक्तीस जर अधिक मूलगामी उपायांची जोड नसेल तर ते अल्पजीवी ठरतील. असे उपाय हे केवळ पूरक भूमिका वठवू शकतात. या बाबतीत एक उदाहरण द्यावेसे वाटते. जागतिक मराठी परिषदेच्या निमित्ताने परदेशातून भारतात आलेल्या काही माणसांच्या मुलाखती दूरदर्शनवर घेण्यात आल्या. त्यावरून असे दिसून आले की भारतातून परदेशात, विशेषतः पाश्चात्त्य देशात, गेलेली पहिली पिढी तर 'मराठी' राहाण्याचा आटोकाट प्रयत्न करते आहे, परंतु त्यानंतरची, तिथे निपजलेली मुले फारशी मराठी राहत नाहीत. त्यांना मराठी भाषाही या पहिल्या पिढीइतकी समजत नाही, आणि पालकही याबाबतीत त्यांच्यावर सक्ती करीत नाहीत. अशा मुलांभोवतीचे सगळे वातावरणच अमराठी आहे एवढे म्हणून सुटका करून घेता येणार नाही. कारण भारतातील शहरांचा चेहरामोहराही झपाट्याने पाश्चात्त्य

होत चालला आहे. या उदाहरणावरून एक गोष्ट लक्षात ठेवावी लागेल की (अगदी भारतातील) सर्वसामान्य माणसेही आपल्या पुढच्या पिढीवर अशी सक्ती करण्यास इच्छुक नसतात. याबाबत काही उपाय योजला गेला नाही तर मराठी भाषेस शासकीय प्रतिष्ठा मिळूनही फारसा उपयोग होणार नाही.

सर्वप्रथम एक गोष्ट लक्षात ठेवणे अत्यंत महत्त्वाचे आहे. ती म्हणजे भाषेला स्वत:चे असे स्वयंभू अस्तित्व नसते. तिचे अस्तित्व, तिची निर्मिती आणि म्हणून तिचा ऱ्हास या गोष्टी पूर्णपणे मानवी समाजावर अवलंबून आहेत. समाज आपल्या सोयीसाठी, नेहमीच्या व्यवहारासाठी, विचारांच्या आदानप्रदानासाठी भाषा निर्माण करतो. निर्माण करतो असे म्हणण्यापेक्षा ती निर्माण होते. ती एक नैसर्गिक प्रक्रिया आहे. अर्थव्यवहारात चलनी नाणी आणि नोटा यांचे जे कार्य असते तेच भाषेचे, भाषेतील शब्दांचे असते. आणि जी नाणी किंवा नोटा चलनात नाहीत, कालबाह्य झालेली आहेत त्यांचा त्या दृष्टीने काही उपयोग नाही. फक्त संग्रह करण्यासाठी त्यांचा उपयोग होईल. त्याचप्रमाणे भाषेतील जे विचार, कल्पना, शब्द किंबहुना एखादी भाषाही जर कालबाह्य झाली असेल तर समाजव्यवहारात तिचा काही उपयोग होणार नाही. समाज तिचा त्यागच करील. प्रश्न हा आहे की मराठी भाषा आपण कोणत्या प्रकारे जतन करणार आहोत? केवळ एक संग्रह म्हणून ती जतन करायची आहे की नेहेमीच्या व्यवहारातही ती उपयोगी पडेल अशा प्रकारे जतन करून ठेवायची आहे? जर नेहमीच्या व्यवहारासाठीही ती वापरात यावी असे वाटत असेल तर तिच्यात बदल करणे (किंबहुना होणे) अपरिहार्य आहे. असा बदल अपरिहार्य, आवश्यक आहे, याचे कारण आपले दैनंदिन जीवन आज बदललेले आहे. परिच्छेदाच्या सुरुवातीसच हे सांगितले आहे की भाषेचे अस्तित्व आणि तिची निर्मिती या गोष्टी समाजावर अवलंबून आहेत. आणि समाजाच्या आजूबाजूच्या परिस्थितीचा थोडक्यात भौतिक परिस्थितीचा परिणाम भाषेवर अपरिहार्यपणे होतो. 'थालीपीठ' या शब्दास इंग्रजी प्रतिशब्द नाही. त्याचप्रमाणे 'केक' या शब्दास मराठीत प्रतिशब्द नाही. याचे कारण इंग्रजांकडे 'थालीपीठ' आणि आपल्याकडे 'केक' हा प्रकार नाही. बस, टॅक्सी, ट्रेन यांना मराठीत प्रतिशब्द नाहीत. (कोळशाची इंजिने कालबाह्य व्हायला लागल्यापासून 'आगगाडी' हा शब्दही कालबाह्य होत आहे.) याचे कारण हे प्रकारच पूर्वी अस्तित्वात नव्हते. त्यामुळे हे शब्द मराठी भाषेस जसेच्या तसे स्वीकारावे लागले. काही बाबतीत मराठी प्रतिशब्द शोधून काढलेही गेले. उदा. टी. व्ही. साठी दूरदर्शन इ. परंतु सुटसुटीतपणाच्या अभावामुळे ते रूढ होऊ शकले नाहीत. उद्या 'स्कायलॅब'साठी कुणी 'अवकाश प्रयोगशाळा' असा अगडबंब शब्दप्रयोग करू पाहील तर ते जमणार नाही. आणखीही एक उदाहरण घेता येईल. 'लॉंड्री' ही सुविधा पूर्वी

कधी मराठी समाजात अस्तित्वात नव्हती. त्यामुळे त्यासाठी मराठी भाषेत प्रतिशब्द नाही. अशा आणखी अनेक उदाहरणांनी ही गोष्ट स्पष्ट होईल की आत्ताच्या भौतिक परिस्थितीच्या मानाने आपली मराठी भाषा मागासलेली आहे. कदाचित् असे म्हणता येईल की अशा सुविधा किंवा अनेक आधुनिक वस्तू शहरांपुरत्या मर्यादित आहेत. परंतु आज ना उद्या त्या खेड्यांमध्येही जाऊन पोहोचणार आहेत आणि त्यांना समर्पक असे शब्द मराठी भाषेत तेव्हाही नसतील. (जर मराठी भाषेने वरील शब्दच आत्मसात केले नसतील तर.) हे सर्व केवळ आत्ताच घडते आहे असें नव्हे. आजपर्यंत मराठी समाजास अपरिचित अशा वस्तूंचा जेव्हा मराठी समाजाशी संपर्क आला तेव्हा तेव्हा हे घडत आले आहे आणि मराठी भाषेने सदर वस्तूंच्या पारिभाषिक संज्ञाच आत्मसात केल्या आहेत. मात्र आजपर्यंत अशा वस्तूंचा जीवनाशी एवढा निकटचा संबंध येत नव्हता, त्यांच्याशिवाय जीवन अशक्य होण्याइतकी पाळी येत नव्हती. आता ते घडत आहे. या ठिकाणी एका गोष्टीचा विचार करावयास हवा. हे सर्व फक्त मराठी समाजातच घडले आहे का ? आणि याचे उत्तर नाही असे आहे. जवळपास सर्वच भारतीय भाषिक समाजांमध्ये हे घडले आहे. त्यामुळे इंग्रजीच्या कुरघोडीचा प्रश्न हा जवळपास सर्वच भारतीय भाषांना भेडसावणारा आहे. इंग्रजांचे राज्य भारतावर प्रस्थापित होईपर्यंत संपूर्ण भारतीय समाजच भौतिकदृष्ट्या एवढा मागासलेला होता की नव्या गोष्टींचा समावेश जेव्हा इंग्रजांमार्फत भारतात झाला तेव्हा त्यांच्या इंग्रजी संज्ञा, त्यांचे कार्य, कारणे, तत्वे इत्यादी गोष्टींचे बाळकडू इंग्रजी भाषेतूनच मिळाले. पहिली औद्योगिक क्रांतीही ब्रिटनमध्येच घडून आली. त्यामुळे खुद्द ब्रिटनमध्ये आणि अन्यत्र, माणसांच्या भौतिक विश्वात जी क्रांती झाली ती इंग्रजीच्या कुरघोडीच्या रूपानें सर्वत्र दृश्यमान झाली. फ्रान्ससारख्या प्रगत देशातही इंग्रजीची फ्रेंच भाषेवर कुरघोडी झाली. इंग्लंडनंतर अमेरिकेने (की जिची भाषाही इंग्रजीच आहे) या क्रांतीत भर टाकली आणि आजतागायत ही भर पडत असल्याने इंग्रजीचे महत्त्व कायम आहे. अतिशय प्रदीर्घ काळ भारतीय समाज भौतिकबाबतीत मागासलेला राहिला. भौतिक विज्ञानातील ज्ञान वाढण्याची प्रक्रिया कुंठित राहिली आणि भारतीय भाषा मागासलेल्याच राहिल्या. सध्याच्या जीवनात भारतीय भाषा आणि म्हणून अर्थातच मराठी भाषा, व्यवहारासाठी का अपुरी वाटते याचे कारण म्हणजे ती २–३ शतकांपूर्वीच्या समाजाची भाषा आहे. स्वातंत्र्यलढ्याच्या आणि स्वातंत्र्य मिळाल्यावर भारतीय समाजाचे हे भौतिक मागासलेपण घालवण्याचा आणि भौतिकबाबतीत देशाची प्रगती साधण्याचा संकल्प केला गेला. भारतीय भाषांची, आणि म्हणून मराठीची, पीछेहाट होण्याचे कारण या धोरणात शोधावे लागेल. हे धोरण त्याज्य ठरवून कालचक्र उलटे फिरवणे हे अशक्य आहे.





अनुक्रमणिका

मराठी आणि अन्य भारतीय भाषांचा इंग्रजी भाषेशी जो संघर्ष चालला आहे त्यास असा व्यापक संदर्भ आहे. आज आपला देश विकासाच्या एका टप्प्यावर उभा असताना आणि आपले धोरण आपण निश्चित केले असताना असा संघर्ष अटळ आहे. भारतीय समाज दीर्घकाळ मागासलेला राहिल्याचे परिणाम ज्या अनेक प्रकारें आपणास भोगावे लागत आहेत, त्यापैकी भारतीय भाषांची पीछेहाट हा एक प्रकार आहे आणि या संदर्भातच या प्रश्नाकडे पाहावे लागेल. येथे आणखी एक गोष्ट नमूद करावीशी वाटते, 'इंग्रजीस पर्याय हिंदीचा' अशी भूमिका घेऊन याबाबतीत काही उपयोग होण्यासारखा नाही. इतर भारतीय भाषांसारखीच स्थिती हिंदीचीही आहे. त्या भाषेचें ज्ञानभांडारही इतके समृद्ध नाही की जे वर्तमानकाळाशी आणि म्हणून इंग्रजी भाषेशी स्पर्धा करू शकेल. या कारणामुळेच हिंदी ही राष्ट्रभाषा मानली गेली असूनही इंग्रजी भाषेचा वापर आणि प्रभाव वाढता आहे.

यावर उपाय काय या पुढचा प्रश्न आहे. आणि त्याचे उत्तर असे देता येईल की निरनिराळ्या विषयातील आधुनिकज्ञान, विचारकल्पना, त्यांच्या अनुषंगानें होणाऱ्या तांत्रिक प्रगतीमुळे भौतिक विश्वात, भौतिक जीवनात घडणारे बदल इत्यादींची दखल मराठी भाषेस घ्यावी लागेल. एवढेच नव्हे तर हे सर्व आत्मसात करावे लागेल. तरच तिचा व्यवहारात समर्थपणे वापर करता येईल. ती चलनातून रद्द होण्याची पाळी येणार नाही. या कामी शिक्षणाचा, ज्ञानप्रसाराचा फार मोठा वाटा असणार आहे. परंतु हे शिक्षण म्हणजे मराठी भाषेचे शिक्षण असा अर्थ नसून निरनिराळ्या विषयांचें मराठी भाषेतून शिक्षण आणि मराठी भाषेतून ज्ञानप्रसार असा अर्थ आहे. मराठी हा विषय घेऊन पदवी अथवा पदव्युत्तर परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्यांना रोजगाराच्या पुरेशा संधी उपलब्ध नसतात हे मराठी भाषेच्या पीछेहाटीमागील एक कारण असल्याचा दावा करण्यात येतो. परंतु तो फारसा समर्थ नाही. मराठीच काय पण अन्य भाषा, अगदी इंग्रजी घेऊनही वरील परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्यांच्या बाबतीत रोजगाराचा प्रश्न सारखाच आहे. इंग्रजी भाषेचा वापर तिच्या साहित्यपरंपरेचा आणि त्याच्या अभ्यासाचा परिपाक नसून आधुनिक काळाशी ती भाषा स्पर्धा करू शकतें, या गोष्टीशी निगडित आहे. दिवसेंदिवस भावी काळातील उपजीविकेच्या मार्गास अनुसरून शिक्षण घेण्याचा आणि देण्याचा कल वाढीस लागत आहे, लागणार आहे. अशा वेळीही सर्व ज्ञान इंग्रजी भाषेतून उपलब्ध असताना तिचा वापर कायमच राहाणार आहे. मराठी भाषा अधिकाधिक वापरात यावी असे वाटत असल्यास अशा प्रकारचे शिक्षणही (म्हणजे Vocational आणि Career Oriented,) मराठी भाषेतून देता येईल इतक्या प्रगत अवस्थेस मराठी भाषा पोहोचवावी लागेल. मराठी भाषेतून ज्ञानप्रसार यासाठी कार्यरत



अनुक्रमणिका

असणाऱ्यांपैकी 'मराठी विज्ञान परिषद' ही एक आहे. या परिषदेने 'जागतिक परिषदे'बाबत किती हिरीरीने रस घेतला किंवा जागतिक मराठी परिषदेने 'मराठी विज्ञान परिषदे'सारख्या संस्थांची कितपत दखल घेतली हे प्रश्न विचारण्यासारखे आहेत. त्यांच्या उत्तरावरून मराठी भाषेच्या संवर्धनास आपण किती महत्त्व देतो आणि त्याबाबत किती प्रयत्नशील आहोत हे ठरविता येईल.

मराठी साहित्याची परंपरा आपण चक्रधर स्वामी, ज्ञानेश्वरमहाराज यांच्यापासून सांगतो. नामदेव, तुकाराम, रामदास आणि अन्य संतांनी त्यात मोठी भर घातली आणि मराठी भाषेला समृद्ध केले. केवळ मराठी भाषाच नव्हे तर अन्य भारतीय भाषांच्या विकासात संतवाङ्मयाचे स्वत:चे असे महत्त्वाचे स्थान आहे.

पूर्वीच्या काळी अध्यात्मविचार, भारतीय तत्त्वज्ञान यांसंबंधीचे सर्व ज्ञान संस्कृत भाषेत होते आणि आज पालक आपल्या मुलांना ज्याप्रमाणे इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालतात, त्याप्रमाणे सदर ज्ञान प्राप्त करण्यासाठी त्या काळच्या मुलांना संस्कृत शिकणे अपरिहार्य होते आणि पाठशाळेतून संस्कृत भाषेतूनच शिक्षण मिळे. त्यावेळच्या आपल्या निष्ठा वेगळ्या होत्या, आजच्या आपल्या निष्ठा वेगळ्या आहेत. आज आपण भौतिक प्रगतीस अधिक महत्त्व देतो. या बदललेल्या निष्ठांशी अनुरूप भाषेसही बदलावे लागेल. गीतेतील तत्त्वज्ञान ज्ञानेश्वरीतून सांगणारे, मराठी भाषाही अमृतासारखी गोड असू शकते हे दाखवून देणारे ज्ञानेश्वर हे भाषिक संघर्षाच्या एका टप्प्यावर उभे होते. आज आपण दुसऱ्या टप्प्यावर उभे आहोत. मराठीतून तत्त्वविचार आणण्याची, त्याची मुहूर्तमेढ रोवण्याची कामगिरी ज्ञानेश्वरांनी केली. हे प्रयत्न इतर संतांनी वृद्धिगत केले. त्यास 'फळे रसाळ गोमटी' आली आणि मराठी भाषा याबाबतीत संस्कृतइतकीच समर्थ, प्रभावी ठरली आणि संस्कृत भाषेची आवश्यकता उरली नाही. संत वाङ्मयाने इतर भाषांतही अशाच प्रकारचे कार्य केले. त्यावेळच्या संघर्षात मराठी भाषा टिकून राहिली. आज काळ बदलला आहे आणि या बदलत्या काळातही मराठी भाषा टिकून रहावयाची असेल तर ज्ञानेश्वरीच्या थोरवीचा वारसा सांगून पुरेसे होणार नाही. काळाची मागणी त्यापेक्षा मोठी, वेगळी आहे. असे किती आधुनिक ज्ञानेश्वर मराठीबद्दल आपुलकी बाळगून आहेत, तिच्या वृद्धीसाठी झटत आहेत, हा खरा प्रश्न आहे. ज्ञानेश्वरीची सिद्धता हा मराठीच्या विकासातील पहिला टप्पा होता, आज आपण दुसऱ्या टप्प्यावर उभे आहोत. भाषिक संघर्षाची परंपरादेखील इतकी जुनी आहे.

**श्रीराम प्रसाद, खोली क्र. ७, ८३/८४ लो. टिळकनगर, ५ वा रस्ता, म. गांधी रस्ता, गोरेगाव (प.) मुंबई ४०० ०६२**

# प्रयागराजची सरस्वती नदी नसून भाषा होती

रामनारायण त्रिपाठी

प्रयागजवळची त्रिवेणी संगमातील सरस्वती एक नदी नसून ती एक भाषा होती. मात्र प्रचलित समजूत अशी आहे की, गंगा-यमुना नद्यांच्या प्रवाहात सरस्वती नदी गुप्त झाली आहे. उगमापासून ती वाहत आली, पण प्रयागला ती गुप्त झाली.

इकडे तर काही पुरातत्त्ववेत्यांनी तिच्या शोधाची एक योजनाही आखली आहे. त्या योजनेच्या संदर्भात मला काही सांगायचे आहे.

खरे पहाता सरस्वती काही एक नदी नाही, ती एक भाषा आहे. संस्कृत भाषेच्या संकेतानुसार असे स्पष्ट होते की, ही सुधारित आणि परिमार्जित अशी भाषा आहे. आता यावर असा प्रश्न उपस्थित होतो की, ती अशी कोणती भाषा आहे, की जी परिष्कृत झाल्यावर संस्कृतमध्ये ती एकजीव झाली ? सिंधुनदीच्या खोऱ्यापासून प्रयागपर्यंत कथ्य भाषेच्याच म्हणजे बोली भाषेच्या स्वरूपात असणारी सरस्वती ही एक भाषा होती. आचार्य पाणिनी आणि पूर्वीच्या व्याकरणकर्त्यांनी सरस्वती भाषेतील शब्द निवडून सर्वांत आधी आठ हजार धातूंपासून संस्कृतभाषेचे सद्यःकालीन स्वरूप तयार केले.

मनुस्मृतीमध्ये भारताचा ज्या ज्या देशात काही भाग येतो, ते देश म्हणजे ब्रह्मावर्त, कुरुक्षेत्र, ब्रह्मर्षि देश, आणि मध्यदेश. ब्रह्मावर्त देश अर्थात् सरस्वती आणि दृषद्वती या देवनद्यांच्या मध्यातील जो देश आहे, त्याला (देव नदीनिर्मित) ब्रह्मावर्त असे म्हटले आहे. कुरुक्षेत्रादि ब्रह्मर्षि देश अर्थात् कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल, आणि शूरसेन देश हे ब्रह्मर्षि देश होत. दिल्लीपासून उत्तरेकडे, यमुनेच्या उत्तरेला गंगा नदीपर्यंत आणि यमुना नदीच्या पश्चिमेकडील जो भाग आहे त्याला कुरुक्षेत्र असे संबोधिले आहे. यातच सध्याच्या काळात उत्तरप्रदेशातील देहरादून, सहनपूर, मुजफ्फरनगर, मेरठ (मीरत), बुलंदशहर आणि हरियाणा प्रदेशातील अंबाला, करनाल, रोहतक, आणि गुडगाव यांचाही समावेश होतो.

सरस्वती नदीच्या किनाऱ्याला भारताची संस्कृती उगम पावली. या किनाऱ्यालगत वस्ती करून राहिलेल्या पंडित–विद्वानांनी या दिशेने बरेच काही काम केले आहे. या नदीच्या किनाऱ्यावरील वैदिक यागविधींबद्दल **ऋग्वेदातील** नदी सूक्तांत (ऋग्वेद : १०.७५) उल्लेख आला आहे. ज्यांना त्यासाठी सारस्वत ब्राह्मण असे

म्हटले गेले, त्यांचेच वंशज आज भारतात, विशेषत: उत्तर भारतात आढळून येतात.

सरस्वती आजदेखील प्राचीन काळच्या पात्रातून हरियाणामध्ये वाहत जाते, आणि ती राजस्थानमध्ये लुप्त होते. दृषद्वती त्या सरस्वतीची उपनदी आहे. दृषद्वती व सरस्वती या दोन्ही नद्या सतलज व यमुना यांच्या मधल्या प्रदेशातून वाहतात. सरस्वती नदीच्या गुप्त झालेल्या स्थानाचा विनशन नावाने उल्लेख केला जातो.

**ऋग्वेदातील** १०:७५ या भागाला नदीसूक्त म्हटले आहे. या सूक्तांत सरस्वती आणि दृषद्वती या दोन्ही नद्यांचे वर्णन आले आहे. **ऋग्वेदाच्या** ३ : २३ : ४ या मंत्रात अग्निदेवतेची प्रार्थना करण्यात आली आहे. ती अशी की, सरस्वती, आपदा, आणि दृषद्वती या नद्यांच्या काठी वास्तव्य करून रहाणाऱ्यांच्या घरात धनसंपत्ती-सह प्रदीप्त होण्याची कृपा करावी. दृषद्वती नदीला मारकंडा असेही म्हटले जाते. दृषद्वतीचे उगमस्थान हिमालयातील प्रत्यंत पर्वतात आहे. प्राचीन धर्मग्रंथातून हेही समजते की दृषद्वती नदीत कधी पाणी वाहत होते आणि कधी नाही. अर्थात् ती पावसाळी वाहणारी नदी आहे. सरस्वती आणि दृषद्वती नद्यांच्या संगमावर होणाऱ्या यज्ञांची व अनुष्ठानांची वर्णनेही धर्मग्रंथातून आढळतात.

आता प्रश्न असा निर्माण होतो की, सरस्वती नदी प्रयाग संगमातच गुप्त झाली अशी समजूत पुराणांच्या काळात कधी उद्भवली ? **मनुस्मृतीमध्ये** भारतातील ज्या प्रदेशांची नावे आली आहेत त्यात ब्रह्मावर्त, कुरुक्षेत्र, आणि मध्यप्रदेश ही नावे आहेत. मध्यदेश वा मध्यप्रदेशाबद्दल मनुस्मृतीच्या अध्याय २ मधील श्लोकात म्हटले आहे की, हिमालय आणि विंध्याचल, विनशन (तांडव ब्राह्मण २५ : १० : १६) मध्ये, जिथे सरस्वती नदी वाळवंटात गुप्त झाली आहे त्या स्थानाचे नाव विनशन असल्याचे म्हटले आहे. मध्यप्रदेशात सरस्वती नदी ज्या विनशन प्रदेशात लुप्त झाली आहे, तो भाग प्रयागपर्यंत पसरला होता. पुराणकालीन लोकांनी असे मानले की, सरस्वती नदी गुप्त झाली ती विनशन स्थानीच. पण त्यानंतर ती जमिनीखालून येऊन गंगा-यमुना संगमात येऊन विलीन झाली आहे.

सरस्वती नदीने प्रयाग संगमात गुप्त होणे, या कथनाला वेद किंवा महाभारता-सारख्या अन्य ग्रंथातून आधार मिळत नाही. महाभारत हा भारतीयांचा महाकाव्य-रूप एक आकर ग्रंथ आहे. (आकर म्हणजे खाण.) त्यात भूगोल, इतिहास, संस्कृती यांची अपूर्व आणि असीम अशी सामग्री आहे. महाभारतात गंगा-यमुना यांच्या संगमाबद्दल अनेक ठिकाणी उल्लेख आढळतो — जो मनुष्य गंगा-यमुनांच्या संगमात स्नान करतो त्याला अश्वमेध यज्ञ केल्याचे पुण्य प्राप्त होते आणि तो आपल्या कुळाचा उद्धारकर्ता होतो असा तो उल्लेख आहे.

महाभारताच्या वनपर्वात (८५ : ८५) असे सांगितले आहे की, चारी विद्यांच्या

ज्ञानाने मिळणाऱ्या, तसेच सत्य बोलल्यावर मिळणाऱ्या सर्व पुण्याइतकेच पुण्य गंगा-यमुना यांच्या संगमात स्नान केल्यावरही मिळते. पण महाभारतात गंगा-यमुना यांच्याबरोबर सरस्वतीचा उल्लेख आढळत नाही. प्रयाग येथे गंगा-यमुना यांचाच संगम असल्याचे स्पष्ट होते. पण या गोष्टीला आणखी एक पुष्टी मिळते की, गंगा-यमुना संगमाला त्रिवेणी संगम असे म्हणतात. वेणी या शब्दाचा अर्थ केसांचा पेड असाही होतो. शिवाय वेणी याचा अर्थ पाण्याचा प्रवाह असादेखील होतो. प्राचीन काळापासून जर वायुयानातून हा प्रवाह निरीक्षण करून पाहिला तर, एक गंगा नदीचा, दुसरा यमुनेचा, आणि तिसरा दोन्ही नद्या मिळाल्यावर झालेला संमिलित प्रवाह, अशा तीन वेणी दिसतात. आणि यामध्ये जर सरस्वती नदी मिळाली असती तर चतुर्वेणी संगम असे म्हणावे लागले असते. याचाच अर्थ सरस्वती नदी नाही. परंतु सरस्वती भाषा आहे की जी सिंधुखोऱ्यापासून ते मध्यप्रदेशातील प्रयागस्थानापर्यंत बोलली जात होती. ही गोष्ट आणखी अशा पद्धतीने समजू शकते.

जेव्हा एक रस्ता दुसऱ्या रस्त्याला मिळतो तेव्हा त्याला 'तिराहा' (तिठा) म्हणतात. आणि चार रस्ते एकत्र येतात तेव्हा त्याला 'चौराहा' (चवाठा) म्हणतात. तसाच हा प्रकार. (राह म्हणजे वाट, रस्ता.)

गंगा नदी देवलोकांतून अलखनंदा नावाने (यथामूल) पुढे जाते. ज्या ठिकाणी अलखनंदाला आणखी एक नदी मिळते त्याला प्रयाग असे म्हणतात. अशा प्रकारे मंदाकिनी नदी अलखनंदा नदीला मिळते, त्या स्थळाला रुद्रप्रयाग असे म्हटले जाते. अलखनंदा आणि धौसी नद्यांच्या संगमाला विष्णुप्रयाग, अलखनंदा आणि पिंडर नद्यांच्या संगमाला नंदप्रयाग, आणि अलखनंदा व भागीरथीच्या संगमाला देवप्रयाग म्हणण्यात येते. मात्र केवळ गंगा-यमुना यांच्या संगमालाच प्रयागराज म्हटले आहे. राज याचा अर्थ सर्वांत चांगला – महत्त्वाचा !

मात्र सरस्वती म्हणजे अमुक भाषा असा शब्द कोणत्याही कोशात मिळू शकणार नाही. सरस्वती म्हणजे वाणी. कारण ती केवळ बोली भाषा होती. पुढे सरस्वती भाषा परिष्कृत होऊन संस्कृत भाषा झाली. म्हणून या दोन्ही भाषांच्या कोशांना आपण संस्कृत भाषा कोशही म्हणू शकतो.

**उत्तरप्रदेश विधानसभेचे माजी उपाध्यक्ष, ६९ हलवासिया मार्केट, हजरतगंज, लखनऊ २२६००१**

**मूळ प्रकाशन : साप्ताहिक हिंदुस्थान** (दिल्ली) १९८८. ०१–३१, पृ. १९.
**अनुवाद : दत्तू गोरे**, ७६८/१३ पी. वाय. सी. जिमखाना, पुणे ४११००४





अनुक्रमणिका

# सरस्वती ही नदीच होती

सरस्वती नदी केवळ कपोलकल्पित आहे की कधीकाळी खरोखरीच अस्तित्वात होती, हा एक असा प्रश्न आहे की त्यावर अनेक वर्षे चर्चा होत आलेली आहे. थारच्या वाळवंटाकडे लक्ष देता असे वाटते की आता ही चर्चा समाप्तीच्या टप्प्यावर आलेली आहे.

संशोधकांचा असा दावा आहे की त्यांनी ऋग्वेदामध्ये 'नद्यांची जननी' या संज्ञेने ओळखल्या जाणाऱ्या या नदीचा काही प्रमाणात शोध लावला आहे.

'सरस्वतीचा शोध' या प्रकल्पामध्ये पुरातत्त्वज्ञ, भूवैज्ञानिक भूगोलज्ञ, इतिहासकार यांचा २० सदस्यांचा एक गट आहे. उच्च तंत्राच्या साहाय्याने या गटाने १९८५ मध्ये हा प्रकल्प अंबाला येथे शिवालिक पर्वतमालेतील आदिबद्री या स्थानापासून सुरू केला होता.

आदिबद्रीपासून गुजरातच्या सोमनाथपर्यंत ३५०० किलोमीटर अंतराचे हे सर्वेक्षण सर्वमान्य पुरातत्त्वज्ञ कै. डॉ. व्ही. एस्. वाकणकर यांच्या नेतृत्वाखाली सुरू झाले होते.

गटातील एका सदस्याच्या मतानुसार त्यांनी या ३५०० किलोमीटर क्षेत्राचा पूर्ण शोध घेऊन १५० प्रमुख ठिकाणांची निवड केली होती.

हा शोध घेतल्यानंतर त्यांना पूर्ण रूपाने विकसित झालेल्या नदीकाठच्या संस्कृतीच्या अस्तित्वाचे स्पष्ट पुरावे मिळाले आहेत. याच नदीला ते सरस्वती नदी मानतात

या महत्त्वपूर्ण पुराव्यांखेरीज आणखी असेही वैज्ञानिक पुरावे मिळतात की जे वेदातील सरस्वतीच्या वर्णनाशी जुळतात. पुरातत्त्वविज्ञानातील एक विश्वसनीय उपकरण 'मल्टीस्पेक्टोरल स्कॅनर' याच्या साहाय्याने घेतलेल्या शोधामधून असे निष्पन्न झाले आहे की या नदीच्या काही शाखा पण होत्या. या स्कॅनरच्या सर्वेक्षणानुसार घग्गर नदीची सतलज ही मुख्य उपनदी होती. (सरस्वती नदीचे आधुनिक नाव घग्गर हे असून ती आता पाकिस्तानमध्ये आहे.)

वास्तुशिल्पातील घडामोडींमुळे सतलज नदीचा प्रवाह बदलला आणि त्यामुळे घग्गर नदी कोरडी पडली.

डॉ. वाकणकरांनी पुरातत्त्वीय सर्वेक्षणाच्या नंतर सांगितले की वायव्य राजस्थानातील थर वाळवंटाचा भाग चार-पाच हजार वर्षांपूर्वी पूर्णपणे हरित होता. त्यांचे मत असे आहे की सरस्वतीच्या काठावर वसलेल्या हडप्पा नगरवासियांसाठी इ. स. पू. ३००० हा काळ सुवर्णयुग होता. जवळजवळ सर्वच इतिहासकारांचे असे

मत आहे की सरस्वतीच्या काठावर वसलेले हे सर्व लोक वेदांचे मोठे जाणकार होते.

सरस्वती कोरडी पडायला सुरूवात झाल्यानंतर हे हडप्पा-निवासी लोक हळू-हळू हरितक्षेत्रांच्या दिशेने सरकू लागले. यावरून मॉर्टिमर व्हीलरने प्रतिपादिलेले, आर्यच वेदाचे जाणकार असून त्यांनी हडप्पा संस्कृती नष्ट केली, हे मत खोटे ठरले.

सरस्वती नदी गुप्त झाली याचा पुरावा पुराणांमध्येसुद्धा मिळतो. त्याखेरीज महाभारत आणि रामचरित मानस यांमध्येसुद्धा या विषयांचा ऊहापोह आहे.

**पूर्वप्रसिद्धी** : दैनिक नवभारत ( हिंदी दैनिक ) दि. १३-१०-१९८९

**कानी पडलेला संवाद**

"काय गं आता आठवीतून नववीत गेलीस ना तू ? कसे मार्क पडले आठवीत ?"

" मार्क बरे पडले. पण जर्मनमध्ये जरा कमीच आहेत. मला जरा शिकवाल का जर्मन ?"

"मला वाटतं तू जर्मन स्कोअरिंगसाठी घेतलं होतंस ना ? मग मार्क कमी पडले तर जर्मन घेऊन काय फायदा ? बरं, तुझ्या जर्मनच्या वह्या, पुस्तकं जरा घेऊन ये.

दोन तीन दिवसांनंतर —

"अगं तुझा आठवीतला जर्मनचा पायाच कच्चा राहिलेला दिसतो. मी तुझ्या जर्मनचा अभ्यास जरूर घेऊ शकेन. तुझे मार्कही थोडे वाढतील, पण तुझ्या टोटल-मध्ये फार भर पडेल इतके काही नाही वाढायचे."

"ठीक आहे तेवढे तर तेवढेच."

"पण मला वाटतं तू याऐवजी जर्मन सोडून मराठी का घेत नाहीस ? तुला नववीत बदलायला सवलत असेलच. तुला जर्मनपेक्षा मराठीत नक्कीच जास्त मार्क पडतील."

"ते खरंय काकू, पण मराठी काही घेऊन चालणार नाही."

"का ग ? इंग्लीश मीडियम स्कूलमध्ये मराठी शिकवत नाहीत का ?"

"शिकवतात, पण मी मराठी घेतलं तर वर्गातली मुलं मला हसतील, तेव्हा प्रेस्टिजसाठी मला जर्मन घेणंच भाग आहे."

# विज्ञान, शिक्षण, समाज आणि भाषा

वि. गो. कुलकर्णी

### कुठे चुकले ?

टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च या संस्थेमध्ये विज्ञान आणि विज्ञान-शिक्षण या विषयांत संशोधन करण्याची संधी मला मिळाली. हे काम करीत असताना मनात काही आडाखे तयार होऊ लागले. आपल्या समाजात विद्वान्, प्रतिभासंपन्न आणि सर्जनशील व्यक्तींची वाण नाही. असे असता जागतिक स्तरावरील विज्ञान आणि तंत्रज्ञान व्यवहारांवर आमची पकड किंवा छाप का नाही ? एकीकडे विज्ञानाचा किंवा तंत्रज्ञानाचा अभ्यासक्रम प्रथमश्रेणीत पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांची प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष बेकारी, आणि दुसरीकडे क्षुल्लक कामासाठी सुद्धा परकीय सहकार्याकडे आशाळभूतपणे पहाण्याचा पायंडा, या दोनही गोष्टी एकत्र कशा नांदतात ? नांदल्या तरी समाजाला त्याची चीड का येत नाही ? या आणि अशांसारख्या प्रश्नांनी मी खूपच अस्वस्थ झालो आहे. आपल्या शिक्षण-पद्धतीत काही मूलभूत उणिवा आहेत काय ? आपला सामाजिक व्यवहार कालबाह्य झाला आहे काय ? स्वाभिमानाने जगायचे असेल तर नेमक्या कोणत्या सुधारणा तातडीने करायला पाहिजेत ? प्रत्येक क्षेत्रातील उणीवा आणि जगाच्या संदर्भात आपली पीछेहाट यातील कार्यकारणसंबंध स्पष्ट झाल्यास उपाययोजना आखण्यास मदत होते. अशा काही कार्यकारणसंबंधांची चर्चा करणे हा माझ्या भाषणाचा हेतू आहे. औपचारिक, म्हणजे शिक्षणसंस्थांमधील विज्ञान, तंत्रज्ञानाचे शिक्षण आणि विविध वस्तू तसेच सेवा यांच्या उत्पादन वितरणातील एकूण समाजव्यवहार, यातील परस्परसंबंधाची चर्चादेखील आपणांस करावी लागेल. या विषयातील माझी मते आग्रही नाहीत. समस्या मांडणे, तिकडे लक्ष वेधणे, आणि विचार-विनिमयाला सुरुवात करणे, एवढाच हेतू आहे.

### झेंप आणि उडी यांचे गणित

या खंडप्राय देशात, जवळजवळ प्रागैतिहासिक काळात अडकून पडलेल्या टोळ्यांपासून तो, नवी भाषा नवे ज्ञान आत्मसात करून, आपल्या प्रकांडपांडित्याने प्रभावी शस्त्रसामर्थ्याने रणांगणावर यशस्वी ठरलेल्या जेत्यांची रणधुंदी उतरवण्याचे

बुद्धिवभव असलेल्या पंडितांपर्यंत, सर्व स्तर दिसून येतात. त्यांचा लघुतम साधारण विभाज्य काढून त्याच्या आधारे आपल्या आकांक्षा घडविणे हास्यास्पद होईल. नियोजन करीत असता, आपली झेप जास्तीत जास्त कोठवर जाऊ शकेल याचा अचूक अंदाज घेऊन, निदान तेवढी तरी उडी मारायचीच असा निश्चय करावा लागतो. असे उड्डाण करताना समाजातील दुर्बल घटक मागे पडून अलग होऊ नयेत म्हणून आखलेल्या उपाययोजनाही नियोजनात अंतर्भूत करावयाच्या असतात. सर्वात दुर्बल घटकाला जमेल तेवढ्याच गतीने समाजपुरुष वाटचाल करू पाहील तर इतर अनेक अभागी संस्कृतीप्रमाणे तो इतिहासजमा होईल. पण त्याचबरोबर स्वतःचा उपग्रह स्वतः उडवण्याची क्षमता असली तरी बहुसंख्य प्रजेला साक्षर आणि विज्ञानाभिमुख करण्यासाठी रात्रीच्या अनौपचारिक शाळा उघडताना, बिचकण्याचे काहीच कारण नाही.

**' वाघिणीचे दूध ' याचा अन्वयार्थ**

महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाचे मला तरी फार आकर्षण वाटते. इंग्रजी सुराज्याच्या मोहातून सावरताच, स्वातंत्र्याच्या चळवळीबरोबरच अनेक सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करण्यात आला. स्त्री-शिक्षणाच्या प्रणेत्यांच्या तेजस्वितेचे आणि दूरदृष्टीचे कौतुक करावे तितके थोडेच. समाजातील दुर्बल घटकांसाठी "कमवा आणि शिका" यासारख्या योजना आखून, त्यांची ग्रामीण विभागात अंमलबजावणी करताना, किंवा परकीय राज्यकर्त्यांना फक्त स्वतःची गरज लक्षात घेऊन आखलेल्या अभ्यासक्रमाच्या चौकटीतही स्वाभिमान जागृत करणाऱ्या राष्ट्रीय शिक्षणाची मुहूर्तमेढ रोविताना नेतृत्व थिटे पडले नाही. एवढेच काय, उत्सवादि धार्मिक कार्यक्रमांतून समाजाचे उद्बोधन करण्याचे पद्धतशीर प्रयत्नही करण्यात आले. वर्तमानपत्रे, मासिके, निबंधमाला, व्याख्यानमाला, वादविवेचनमाला, स्वाध्यायमाला यांसारखी पुस्तके, अशी जी जी साधने उपलब्ध होती ती सर्व समाजशिक्षणासाठी प्रभावीपणे वापरण्यात आली. त्यासाठी आवश्यक ते मनुष्यबळ आणि पैसा गोळा करण्यात तत्कालीन नेतृत्वाला अपयश आले नाही.

"इंग्रजी शिक्षण हे वाघिणीचे दूध आहे" या विधानाचाही अन्वयार्थ लक्षात घेणे आवश्यक आहे. ईस्ट इंडिया कंपनीचे व्यापारी, त्यांच्या मागोमाग कंपनी सरकारसाठी आणि नंतर राणीसरकारसाठी आलेली फौज, यांच्या मागोमाग आधुनिक उदारमतवाद, विज्ञान, तंत्रज्ञान, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहास, मानसशास्त्र इत्यादि अनेक क्षेत्रांतील नवे विचार, संशोधनप्रक्रिया, साहित्याच्या नव्या आकर्षक अभिव्यक्ती ह्या साऱ्यांचे "विश्वरूपदर्शन" घडवणारा ग्रंथसंग्रहही आला. आपले भाग्य असे की, ही सर्वस्वी परकी, संस्कृताहून अगदी वेगळी, अशी

भाषा शिकून, हे ग्रंथ वाचणाऱ्या आणि त्या ग्रंथाच्या वाचनाने ज्यांचे डोळे दिपले नाहीत, तर उलट स्वाभिमानाचे दिव्य चक्षु ज्यांना प्राप्त झाले अशा पंडितांची इथे परंपरा निर्माण झाली. "इंग्रजी शिक्षण म्हणजे वाघिणीचे दूध आहे" हे उद्‌गार म्हणजे, जेत्यांच्या अस्त्रसामर्थ्याला, राज्यकारभार चालवण्याच्या टाप-टिपीला, त्यांच्या ग्रंथभांडाराच्या ऐश्वर्याला भाळलेल्या भाबड्या मनाने दिलेला नजराणा नव्हता. ही विद्या आपल्यालाही आत्मसात करता येईल, एवढेच नव्हे तर विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या आधारे संपत्ती आणि सामर्थ्य यांची निर्मिती करता येईल, सामाजिक प्रक्रियांच्या नव्या जाणिवांच्या आधारे, व्यक्तिधर्माचा आत्यंतिक बडेजाव आणि समष्टिधर्माचा (त्यामानाने) अभाव या आपल्या परंपरागत दौर्बल्यावर मात करून, विज्ञानप्रणीत नवी समाजरचना घडविता येईल. या दृष्टीने भारलेल्या पुरुषश्रेष्ठांच्या निश्चयात्मक प्रतिज्ञेचा तो हुंकार होता. हा निश्चय कृतीत आणण्याचा जिवापाड प्रयत्नही झाला. राजा राममोहन रॉय, ईश्वरचंद्र विद्यासागर, स्वामी विवेकानंद, डॉ. प्रफुल्लचंद्र राय, रवींद्रनाथ टागोर, जगदीशचंद्र बोस, सत्येंद्र बोस, मानवेंद्रनाथ राय, बाळशास्त्री जांभेकर, टिळक, आगरकर, रानडे, गोखले, चिपळूणकर, सावरकर, फुले, भाऊराव पाटील, नरसोपंत केळकर, शंकरराव किर्लोस्कर अशी किती नावे घ्यावीत ? हा सारा इतिहास सांगण्याचे हे स्थळ नव्हे. स्वातंत्र्योत्तर शैक्षणिक नियोजन करताना हा तेजस्वी वारसा आपल्या पाठीशी होता याचे स्मरण ठेवावे, या परंपरेवर कळस चढवण्याचे अवघड कार्य न साधले तरी किमानपक्षी इमान राखावे.

**शिक्षणाच्या नियोजनाची बैठक**

शिक्षणाचे देशव्यापी नियोजन करताना पहिला विचार आला तो हा की, जिला शिक्षणसंस्था संबोधता येईल, म्हणजे जिचे जाळे देशभर पसरलेले आणि रुजलेले होते अशी एकच संस्था होती. ती म्हणजे मेकॉलेप्रणीत इंग्रजी शिक्षणसंस्था. अनेकविध विषयांच्या अध्ययनाची सोय, व्यवस्थित आखलेला दीर्घ मुदतीचा अभ्यासक्रम, योग्य त्या टप्प्यांवर परीक्षा घेण्याची सोय, शिक्षणाची नोकरीपेशाशी घातलेली सांगड इत्यादी जमेच्या बाजू गृहीत धरल्या तरी या शिक्षणपद्धतीत एक फार मोठी उणीव होती. इंग्रजांची चाकरी करू इच्छिणाऱ्या मूठभर एतद्देशीयांना तयार करण्यापलीकडे उच्च वा पवित्र ध्येय तिच्यासमोर नव्हते. शिवाय या संस्थेचे जाळे देशभर पसरलेले असले तरी शिक्षणाची परंपरा असलेल्या मध्यमवर्गापलीकडे तिचा पसारा झालेला नव्हता.

अशा परिस्थितीत शिक्षणाची पुनर्रचना तीन अंगांनी होणे आवश्यक आहे असा विचार मांडण्यात आला. शिक्षणाचे सार्वत्रीकरण करून प्रत्येक मुलाला शिक्षणाची

संधी उपलब्ध करून दिली पाहिजे हे एक अंग. नव्या भारताच्या उभारणीस आवश्यक ते मनुष्यबळ तयार करण्यासाठी, केवळ चाकरमान्यांच्या दृष्टीने आखलेल्या शिक्षणपद्धतीत इष्ट ते बदल करून, उद्योगधंदे, शेती, व्यवस्थापन, आरोग्य-सेवा, इत्यादी क्षेत्रात नवी भर घालण्याची कुवत असलेली उत्साही पिढी तयार करण्याची क्षमता असलेली नवी शिक्षणपद्धती सिद्ध करणे हे दुसरे अंग. तिसरे आणि तेवढेच महत्त्वाचे अंग म्हणजे शिक्षणाचा कस वाढवणे, पोपटपंची करणे, कोण काय म्हणतो अगर म्हणाला हे तपशीलवार सांगणे यावर सर्वस्वी भर न देता, चिकित्सक बुद्धीने विचार करू शकणारी स्वयंप्रज्ञा जोपासणे हे शिक्षणाचे व्यवच्छेदक लक्षण होय. शिक्षणाचा कस हा स्वयंप्रज्ञेवरच ठरतो. ही स्वयंप्रज्ञा वाढविणे तितकेच महत्त्वाचे होते.

संसदीय लोकशाहीचा निःसंकोच आणि निरपवाद स्वीकार आणि शिक्षणाच्या सार्वत्रीकरणाला दिलेला अग्रक्रम हे दोनही निर्णय अगदी अचूक होते. दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तीनंतर आशिया, आफ्रिका आणि दक्षिण अमेरिका या खंडांतील विकसनशील देशांच्या अनुभवांचे परिशीलन केल्यावर या निर्णयांचे महत्त्व कळेल.

## समान संधीचा शैक्षणिक संदर्भ

प्रज्ञा, प्रतिभा, आकलनशक्ती, सर्जनशीलता इत्यादी गुणांचा ताम्रपट निसर्गाने कोणत्याही जनसमूहाला लिहून दिलेला नाही. म्हणूनच अर्थप्रधान संस्कृतीतील सामाजिक विषमतेमुळे काही गट शिक्षणापासून वंचित रहात असतील तर तो समाजरचनेचा दोष समजून, अशा विद्यार्थ्यांना थोडचाशा प्रगतीसाठी सुद्धा भरपूर प्रोत्साहन दिले पाहिजे. या विचारातूनच जागा राखून ठेवण्याच्या धोरणाचा जन्म झाला. तथापि केवळ राखीव जागांच्या मदतीने हा प्रश्न सोडवता येणार नाही. मागास विद्यार्थ्यांची शालेय प्रगती निरपवादपणे वाढवावयाची असेल तर अवास्तव प्रोत्साहनावर निरंतर अवलंबून राहता येणार नाही. त्यासाठी शिक्षण-पद्धतीत इष्ट त्या सुधारणा करण्यासाठी संशोधनप्रकल्प आखावे लागतील. असा एक प्रकल्प होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्रामार्फत राबवण्यात आला.

या प्रकल्पाचा सर्वात महत्त्वाचा निष्कर्ष असा की, यश आणि अपयश यांतील दरी कितीही मोठी असली तरी अपयशाची अनेक कारणे शुल्लक असू शकतात. काही अगदी साध्या गोष्टी कोणी स्पष्टपणे न सांगितल्यामुळे, क्षुल्लक वाटणाऱ्या शंकांचे निरसन होत नाही आणि असे बोळे ज्ञानगंगेच्या प्रवाहात अडथळे आणतात. नेमके हेरून हे बोळे काढले की प्रवाह आपोआप सुरू होतो. उदाहरणार्थ डेक्कन क्वीन मुंबईहून पुण्याला तीन तासात जाते. अंतर १२० मैल असल्यास डेक्कन क्वीनचा दरताशी वेग किती ? या प्रश्नाशी ग्रामीण भागातील मुले अडतात ती

गणिती तर्कज्ञान किंवा कौशल्य कमी पडते म्हणून नव्हे, तर डेक्कन क्वीन हे प्रकरण काय आहे हे ठाऊक नाही म्हणून. या माहितीची गणित सोडवण्यासाठी आवश्यकता नाही हे जाणण्याइतका आत्मविश्वासही नसतो. तसेच प्रकाशशास्त्रातील परावर्तनाचे नियम अगदीच सोपे असले तरी आकृती काढताना आरसा म्हणून फक्त एक सरळ (गोलीय आरशासाठी गोल) रेघ काढावी असा संकेत आहे, हे स्पष्ट सांगावे लागते.

पाठ्यपुस्तकातील, विशेषत: विज्ञानाच्या पाठ्यपुस्तकातील बोजड भाषेमुळे शिक्षणाच्या प्रसाराला बसणारी खीळ ही अशीच आणखी एक त्रुटी. विज्ञानाच्या पुस्तकात अपरिहार्यपणे येणाऱ्या संस्कृत पारिभाषिक संज्ञांच्या संदर्भात हे विधान केलेले नाही. विवेचनामध्ये "यावरून असे दृष्टोपत्तीस येते की...", "दातांचा उपयोग प्रामुख्याने अन्नचर्वणासाठी होतो", "लोकमान्य टिळक भारतीय असंतोषाचे जनक होते". अशी भाषा वापरण्याच्या हव्यासावर ही टीका आहे. "सामान्यविज्ञान" या पाठ्यपुस्तकांच्या सुलभ भाषेतील आवृत्त्या तयार करून प्रकल्पात वापरल्यावर, बोजड शब्द, लांबलचक वाक्ये, दूरान्वय इत्यादी दोष काढून टाकल्यावर विद्यार्थ्यांच्या आकलनात लक्षणीय वाढ झाली.

या प्रकल्पात असे अनेक अडथळे हेरण्यात आले. त्या साऱ्यांचे वर्णन करण्याचे हे स्थळ नव्हे. फक्त एवढेच स्पष्ट करावयाचे आहे की, दारिद्र्य आणि परंपरागत सामाजिक विषमता यांमुळे मागास विद्यार्थ्यांना शाळेत शिक्षकाकडून मिळणाऱ्या मार्गदर्शनावरच सर्वस्वी अवलंबून रहावे लागते. त्यांच्या मनातील क्षुल्लक परंतु शिक्षणात अडथळा आणणाऱ्या शंकांची शिक्षकांना कल्पनाच नसल्यामुळे योग्य ते मार्गदर्शन दिले जात नाही. सारे शिक्षण म्हणजे काहीतरी अतर्क्य, गूढ असे गौडबंगाल आहे असा विद्यार्थ्यांचा ग्रह होतो. काही ठराविक मुलांना हटकून पैकीच्या पैकी गुण मिळतात. आपल्या वाट्याला मात्र यश कधीही येत नाही आणि यात आपले चुकते काय हे कधीच समजत नाही. अशा अवस्थेत ही मुले निराश होतात. याबाबत योग्य ते मार्गदर्शन केल्यास अल्पावधीतच त्यांची प्रगती होऊ शकते. अन्यथा शिक्षण ही एक जीवघेणी शर्यत असून, त्यात जिवापाड परिश्रम करणारे आणि म्हणून पदवी मिळाल्यावर उभे राहण्याचेही त्राण न उरलेले मध्यम वर्गातील विद्यार्थी, आणि द्रव्यबळावर काहीही खरेदी करू शकणाऱ्या गर्भश्रीमंत लोकांची ऐतखाऊ मुले एवढ्यांचाच निभाव लागतो हेच चित्र पक्के होईल. हे सारे टाळण्यासाठी विद्यार्थ्यांना विषय समजत नसेल तर अध्यापकाने तीच रेकॉर्ड परत परत वाजवणे, तीन वर्षांचा अभ्यासक्रम चार-पाच वर्षांत पुरा करण्याची लाजिरवाणी सवलत देऊ करणे अशांसारखे काहीतरी थातुरमातुर प्रयत्न न करता जाणीवपूर्वक प्रयत्न करावे लागतील.

अर्थात् दुर्बोध भाषेचा अडसर दूर करणे, आकृत्यांचे संकेत स्पष्ट सांगणे, डेक्कन क्वीन हे काय प्रकरण आहे हे सांगणे एवढ्याच सुधारणा करून भागणार नाही. विद्यार्थ्यांना सहज समजेल अशीच भाषा वापरण्याचा हट्टही अखेरपर्यंत पुरवता येणार नाही. केव्हातरी त्यांची भाषा समृद्ध करण्याचा प्रयत्न करावा लागणारच आहे.

**ज्ञानार्जन, ज्ञानसंक्रमण, आणि भाषा**

इतर प्राण्यांची मजल पर्यावरणाशी जुळवून घेण्यापर्यंतच गेली. पण त्यामुळेच हे प्राणी पर्यावरणात अडकून पडले. मानवाने मात्र अनुभवाचे सार काढण्यात आणि एका पिढीने कष्टाने आणि प्रदीर्घ साधनेने मिळवलेले ज्ञान पुढील पिढ्यांना सहज उपलब्ध करून देण्यात यश मिळवले. ज्ञानार्जन आणि ज्ञानसंक्रमण ही मानवाची वैशिष्टचे आहेत. संक्रमण नेमके कशाचे होते? संकमण होते ते ज्ञानाचे, माहितीच्या ढिगाऱ्याचे नव्हे. नैसर्गिक अनुभव हा कच्चा माल आहे, त्यात खूपच गुंतागुंत असते, ती सोडवून शुद्ध स्वरूपात अनुभव घेण्यास प्रतिभा लागते. पण असे अनुभवातून सार काढून प्रतिभासंपन्न अशा थोड्यांनी घेतलेले ज्ञान उद्या शालेय सामान्यविज्ञान होऊ शकते. म्हणूनच मानवाची प्रगती होते.

निकृष्ट शिक्षणपद्धतीमुळे विद्यार्थ्यांचे तर नुकसान होतेच, एकूण समाजाचेही अपरंपार नुकसान होते. आपल्या आजूबाजूला घडणाऱ्या घटना, आपले निर्णय अथवा कृती यांचा सामाजिक अन्वयार्थ लावण्याची शक्तीच आम्ही गमावली आहे.

वनस्पतिजन्य रंगात कापड रंगत असे तेव्हा वैभवाच्या शिखरावर असलेले फैजपूर जर्मनीत अनिलीनवर आधारित रासायनिक रंगाचा शोध लागताच अक्षरशः भिकेला लागले. काय झाले याची चौकशी करून खंबीरपणे उपाय योजण्याचा प्रयत्नच झाला नाही.

विविध अनुभव एकत्र करून कार्यकारणभाव निश्चित करणे, अनुभवांचे सार काढणे ही कौशल्ये शिक्षणाचाच एक महत्त्वाचा घटक म्हणून जोपासली गेली नाहीत तर ती समाजातून लुप्त होतात. एखाद्या द्रष्ट्या भाग्यवंताला भवितव्याची कल्पना आलीच तर समाज त्याला साथ देतोच असे नाही.

द्रष्ट्या शिवछत्रपतींनी अल्पावधीत शून्यातून आरमार उभे केले. इतके समर्थ की, त्याने इंग्रजी आरमाराला दहशत बसवली. या घडामोडीचा अर्थ न कळल्यामुळे पेशव्यांनी इंग्रजांची मदत घेऊन ते बुडवले. विलासराव साळुंके या प्रज्ञावंत अभियंत्याने उपलब्ध पाण्याचा नेमका वापर करून शेतीचे तुटपुंजे उत्पादन प्रचंड प्रमाणात वाढवण्याचे कौशल्य गरीब शेतकऱ्यांना हाताशी धरून विकसित केले.

त्यांच्या यशाचे परदेशी कौतुक झाले. इथे मात्र शासकीय अडथळे आणि प्रस्थापितांच्या कारवाया यांना त्यांना तोंड द्यावे लागले. देशातील नवीन कल्पना आणि प्रयोग यांकडे दुर्लक्ष करून परकीयांशी हातमिळवणी करण्याची प्रवृत्ती तर पराकोटीला गेली आहे.

असें का होते ? हे सारे स्वार्थ आणि देशद्रोह यांमुळे होतें असे म्हणण्यात अर्थ नाही. सर्वच देशद्रोही ठरत असले तर 'देश' या संकल्पनेला अर्थ उरत नाही.

शिक्षणात मुलभूत सुधारणा करून ज्ञानार्जन आणि ज्ञानसंक्रमण या क्रियांना लागणारी कौशल्ये जोपासणे हा केवळ पुस्तकी प्रश्न नाही. तो आमच्या जीवन-मरणाचा प्रश्न आहे.

**विकासामध्ये भाषेचा वाटा**

भाषा हे मानवाचे खास वैशिष्टय आहे, एवढ्या मर्यादित अर्थाने वरील विधान केलेले नाही. कोणत्याही समाजव्यवस्थेत आढळणारे स्तर, तसेच विविध कामाचे प्रतिष्ठेनुरूप होणारे वाटप, त्या त्या गटाच्या भाषाप्रभुत्वाशी निगडीत असल्याचे दिसते. एखाद्या गटातील व्यक्तींची भाषा ऐकून त्याच्या सामाजिक दर्जाबद्दल बांधलेला अंदाज सहसा चुकत नाही. भाषा हे केवळ मनातील विचार व्यक्त करण्याचे साधन नसून, विचारशक्तीचे आणि दृष्टिसूक्ष्मतेचे अधिष्ठानही असल्यानें, माणसाला कोणत्या कल्पना स्फुरतील, साध्या अवलोकनातसुद्धा कोणता गूढ आशय "दिसेल", स्फुरलेली कल्पना कोणता देह धारण करील, इत्यादी सर्वच गोष्टी भाषेच्या समृद्धीशी निगडीत असतात. भाषा हें ज्ञानसंक्रमणाचे प्रमुख साधन असल्यामुळे गुरूची, शिष्याची तसेच ग्रंथातील अभिव्यक्तीची भाषा समृद्ध, काटेकोर आणि अर्थवाही असणे अनिवार्य आहे, वाचलेल्या मजकुरातील मर्म ग्रहण करणे अभिव्यक्तीची सूक्ष्मता आत्मसात करणे, जेथे अनेकविध कार्य आणि कारणे एकत्र येतात अशा गुंतागुंतीच्या प्रक्रियांचे अचूक वर्णन करणे, इत्यादी कौशल्ये विकसित झाल्याखेरीज ज्ञानग्रहण किंवा ज्ञानसंक्रमण अशक्य आहे. म्हणूनच विद्यार्थ्यांची भाषासमृद्ध करणे हे शिक्षणाचे एक प्रमुख उद्दिष्ट असायला हवे.

कोणतेही मूल समृद्ध भाषा घेऊन जन्माला येत नाही. ते शिक्षण घरी आणि शाळेत होते. पहिल्या पाच वर्षात सामान्य व्यवहाराची भाषा मूल घरीच शिकते. शाळेमध्ये या व्यवहाराच्या भाषेचा योग्य तो विकास घडवून, ज्ञानार्जनाचे अस्त्र तयार करावे अशी अपेक्षा असते. सामाजिक विषमतेमुळे दुर्बल घटकांची व्यवहाराची भाषासुद्धा समृद्ध नसल्याने या वर्गातील विद्यार्थी मागासच राहतात. अभिव्यक्तीची भाषा प्रयत्नपूर्वक घडवली नाही तर आकलनशक्ती विकसित होत

नाही. आणि विद्यार्थी ज्ञानी होण्याऐवजी पढिक होतो. शिक्षणपद्धतीत सुधारणा करताना भाषेचे असाधारण महत्त्व लक्षात घेऊन भाषाविकासावर भर द्यायला हवा होता, तसे झाल्याचे दिसत नाही. उलट गेल्या तीस वर्षात भाषेच्या अध्ययनाचे महत्त्व जाणून बुजून कमी करण्यात आले आहे. इतर विषयांच्या वाढत्या आकर्षणामुळे भाषेचे महत्त्व आपोआप कमी झाले असे नव्हे. भाषेच्या अध्ययनाचे महत्त्व लक्षात न आल्यामुळे, जाणीवपूर्वक काही निर्णय घेण्यात आले. अभ्यासक्रमातून संस्कृत काढून टाकणे, इंजिनिअरिंग, मेडिकल अशा प्रतिष्ठित शाखांत प्रवेश देताना भाषा विषयात मिळालेले गुण लक्षात न घेणे, यांसारखे घातक निर्णय घेण्यात आले आहेत. भाषा हे विचार व्यक्त करण्याचे फक्त साधन असून, खरे महत्त्व विचाराला आहे, भाषेला नव्हे, या भोंगळ विचारसरणीतून हे निर्णय घेण्यात आले. परिणामत: विद्यार्थी भाषा विषय शिकण्यात "वेळ फुकट घालवीत नाहीत." "उत्तीर्ण झाल्याशी कारण" असा सर्वत्र सूर असतो. ज्ञानार्जनाचे आणि ज्ञानसंक्रमणाचे हे प्रमुख शस्त्र बोथट झाल्यावर, वाचलेल्या मजकुराचे सार काढणे, आणि माहितीचे ज्ञानात रूपांतर करणे ही कौशल्ये लुप्त होत चालली आहेत. "यज्ञकुंड विझल्यास शिष्याला शिक्षा होत असे" ही माहिती वाचल्यावर, "शिष्याचे कर्तव्य काय असे ?" या प्रश्नाला उत्तर मिळेनासे झाले. "शिक्षा कोणाला होई ?" उत्तर– "शिष्याला" अशा उथळ प्रश्नोत्तरांच्या पायरीवर आकलन स्थिरावले आहे.

ही समस्या गंभीर आहे. आकनशक्तीचा इतका बोजवारा वाजला असेल तर ज्ञान संपादन होऊच शकणार नाही. विज्ञानाचे उच्च शिक्षण इंग्रजी भाषेतून चालतं. म्हणून आकलनाची ही समस्या इंग्रजी माध्यमाच्या संदर्भात आहे असा गैरसमज होऊ नये, म्हणून पुन्हा एकवार स्पष्ट करतो की ही समस्या सर्व भाषांच्या, मातृभाषेच्याही, संदर्भात भेडसावीत आहे. शालांत परीक्षेत मराठीच्या प्रश्नपत्रिकेत विचारल्या जाणाऱ्या प्रश्नांच्या उथळपणावर आणि त्यामुळे अधिकच स्पष्ट होणाऱ्या भाषाध्ययनाच्या वैय्यर्थ्यावर टीका करावी तेवढी थोडीच. याबाबतीत आमच्या जाणिवाच नष्ट झाल्या आहेत. ज्ञानसंपादनासाठी एक उपयुक्त शस्त्र एवढीच भाषेची महती मर्यादित नाही. भाषा हे मानवी संस्कृतीच्या प्रगतीचे एक व्यवच्छेदक लक्षण आहे. विचारांची झेप आणि भाषेची समृद्धी परस्परावलंबी असतात. शतकानुशतके जमीन करणारा शेतकरी "घटत्या उत्पादनफलाच्या सिद्धांताला" जन्म देऊ शकत नाही. भाषेची समृद्धी वाढल्यावरच हे कार्य होते. जनसामान्यांचा व्यवहारातील भाषा आणि परिश्रमाने जोपासलेली समृद्ध भाषा यात नेमका फरक कोणता हे लक्षात आल्यास शिक्षणपद्धतीत इष्ट ती सुधारणा करता येईल.

## स्थिर आणि चर भाषा

जनसामान्यांची व्यवहारी भाषा त्यांच्या मर्यादित व्यवहाराला उपयोगी पडेल इतपतच समृद्ध असते. नित्य वापरातील वस्तूंची नावे (नामे), नित्य घडणाऱ्या क्रिया दर्शवणारी क्रियापदे, काही विशेषणे आणि क्रियाविशेषणे, एवढ्यापुरतीच ती भाषा मर्यादित असते. अमूर्त संकल्पना, विशिष्ट क्रमाने घडणाऱ्या क्रियांची साखळी असलेल्या क्रियांची नावे, गुंतागुंतीचे कार्यकारणभाव वगैरेंचा त्यात समावेश नसतो. रहदारी, अन्न, शासन, सरकार, आरोग्य, समता असे शब्द ऐकू आले तरी असे शब्द उच्चारणाऱ्याच्या मनातील संकल्पना त्या शब्दांच्या खऱ्या संकल्पनांशी जुळत्या असतीलच याची खात्री नसते. समृद्ध भाषेचे आणखी काही पैलू आहेत. भाषेत विविध प्रकारची उभयान्वयी अव्यये असतात. कारण, परंतु, तरीही, आणि, म्हणून वगैरे शब्दांच्या छटा वेगवेगळ्या आहेत. जनसामान्यांच्या भाषेत हे सारे शब्द आढळले तरी ते बहुधा " आणि " या अर्थानेच वापरलेले असतात.

सांगलीचे एक सुप्रसिद्ध उद्योगपती कै. धनी वेलणकर यांनी आपल्या, " जगात वागावे कसे " या पुस्तकात भाषेच्या उपयोगाचे एक मनोरंजक उदाहरण दिले आहे. नोकर धावत येऊन धन्याला सांगतो, " दादा ! पावणा. " आपल्याकडे आलेल्या पाहुण्याची वर्दी नोकर देत आहे या समजुतीने धनी सांगतो, " ठीक आहे. पाहुण्यांच्या खोलीत त्यांचे सामान ठेव आणि त्यांच्या चहापाण्याची व्यवस्था कर. " नोकर तेथेच चुळबूळ करीत उभा राहतो आणि सांगतो, " माझा पावणा ! " सारी गोष्ट येथे जशीच्या तशी सांगण्यात स्वारस्य नाही. खूपशा प्रश्नोत्तरानंतर खुलासा होतो की सदर नोकराचा मामा गावाहून आला असून, " तुझी आई फार आजारी आहे. तेव्हा धन्याची परवानगी घेऊन तिला भेटायला माझ्याबरोबर चल " असे सांगत आहे. या गोष्टीतील भाषा आणि ज्ञानलक्षी साहित्य ज्या भाषेत लिहिले जाते ती भाषा यातील फरक गुणात्मक आहे. " दादा पावणा " या भाषेकडून ज्ञानलक्षी साहित्याच्या भाषेकडे विद्यार्थ्यांना नेणे हे शिक्षणाचे एक प्रमुख उद्दिष्ट असायला पाहिजे.

आजची जनसामान्यांची मराठी भाषासुद्धा तशी प्रगतच आहे. अप्रगत टोळ्यांच्या भाषेशी तिची तुलना होऊ शकणार नाही. तुलना झालीच तर इतर प्रगत भाषांशीच होईल. तथापि जनसामान्यांची भाषा त्यांच्या व्यवहारांपुरती मर्यादित आणि गोष्ट सांगणारी (कथेकरी) असते. या भाषेचे वर्णन " स्थिर भाषा " असे करू स्थिर भाषेत दैनंदिन व्यवहार करता येतात. परंतु संपूर्ण नवीन तत्त्वे सांगण्याचे सामर्थ्य तीत नसते. शिवाय जेथे अनेक घटक एकत्र कार्य करीत असतात तेथे विविध घटकांतील परस्परसंबंध दाखवण्याची क्षमताही स्थिर भाषेत नसते. स्पष्ट

संकल्पना, अचूक शब्दप्रयोग, विधानाच्या व्याप्तीचे यथार्थ वर्णन यांसाठी लागणाऱ्या भाषेस "चर भाषा" म्हणू. "स्प्रिंगला वजन लटकवल्यास तिची लांबी वाढते, आणि वजन काढून घेतल्यास ती पूर्ववत होते" हे विधान बिनशर्त खरे नाही. काही मर्यादा सांभाळल्या तरच या अनुभवाचा प्रत्यय येतो. तसेच, पाणी शुद्ध असेल आणि हवेचा दाब समुद्रसपाटीवरील वातावरणाच्या दाबाइतका असेल तरच पाणी १०० अंश सें. या तापमानाला उकळते. या मर्यादा ओळखणे आणि त्या नमूद करण्यासाठी अचूक शब्दप्रयोग करणे हे चर भाषेचे लक्षण आहे. चर भाषेचे महत्त्व फक्त विज्ञानाच्या क्षेत्रापुरतेच मर्यादित आहे असे नाही. चर भाषेची गरज सर्वच क्षेत्रांत भासते. पौराणिक कथा, ईशस्तवने, राजस्तुती, दैनंदिन भावविश्व हे सारे प्रकार हाताळणाऱ्या आणि ओवी, अभंग, श्लोक, पोवाडा, लावणी, सुनीत इत्यादि विविध रूपे यशस्वीपणे धारण करणाऱ्या मराठी कवितेला, पुरुषार्थाच्या चौकटीत जीवनपट पहाण्याच्या चाकोरीतून बाहेर खेचणाऱ्या मर्ढेकरांना चर भाषेचा आश्रय घ्यावा लागला. त्यांची चर भाषा पचनी पडेपर्यंत दुर्बोध वाटली. हीच प्रक्रिया सर्व क्षेत्रात घडते. तेव्हा, आपला समाज परावलंबी राहू नये, विज्ञान-तंत्रज्ञान यांसह ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांत या भरतखंडात नवनिर्मिती व्हावी अशी आपली ईर्ष्या असेल, तर स्थिर भाषेकडून चर भाषेकडे प्रवास करण्याचा नियोजनपूर्वक प्रयत्न केला पाहिजे. परंतु पाश्चात्त्यांच्या अंधानुकरणाने म्हणा, किंवा विज्ञान, गणित यांसारखे विषय अग्रक्रमाने शिकवण्याच्या घिसाडघाईने म्हणा, आपण नेमका उलटया दिशेने प्रवास करीत आहोत. भावी इंजिनियरला उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थेत प्रवेश देताना, "तुझे भाषेचे गुण विचारात घेतले जाणार नाहीत" असे आश्वासन देण्याच्या धोरणाचा अर्थ आम्हाला कळतो काय ? पूल बांधण्याची एखादी नवी युक्ती तुला सुचली नाही तरी चालेल. कंत्राटदाराकडून स्वतःचा लाभ कसा करून घ्यावा हे तुला कळले म्हणजे पुरे, असा या आश्वासनाचा अर्थ आहे. डॉक्टर मंडळीची तीच अवस्था. एखाद्या नव्या औषधाच्या माहितीसाठी त्यांना औषध कंपन्यांच्या विक्रेत्यावरच अवलंबून रहावे लागते. सोबतचे पत्रक वाचून स्वतःचे मत बनवण्याच्या कौशल्याचा मेडिकल कॉलेजमध्ये प्रवेश मिळवण्यासाठी काहीच उपयोग होत नाही ना !

मानवी जीवनात भाषेचे महत्त्व फारच मोठे आहे, असे काही समाजशास्त्रज्ञांचे मत आहे. त्यांच्या मते भाषेचा प्रभाव फक्त ज्ञानप्राप्तीपुरताच मर्यादित नाही. स्थिर भाषेत गुंतून पडलेल्या, आणि चर भाषा संपादन केलेल्या समाजांच्या एकूण सर्वच व्यवहारांत फरक दिसून येतो. अप्रगत समाजातील खेळ केवळ शारीरिक क्षमतेवर म्हणजे ताकद, चापल्य, शौर्य, धैर्य या गुणांवरच अवलंबून असतात. दोन स्पर्धकांची धडक होऊन अल्पावधीतच विजयी कोण हे ठरविता येते. त्यात

डावपेच, परिस्थितीनुसार डावपेच बदलणे, इत्यादि गुणांना फारसा वाव असत नाही. याउलट जेथे चर भाषा विकसित झाली आहे अशा प्रगत समाजात डावपेचांवर आधारलेले खेळ आढळतात. स्थिरभाषिकांची युद्धे एका लढाईत संपतात. एका दिवशी सकाळपासून सायंकाळपर्यंत साम्राज्यांचे उदय किंवा अस्त होऊ शकतात. उलट प्रगत समाज, काही चकमकी हरलो तरी युद्ध जिंकू अशी ईर्ष्या बाळगू शकतात. या शास्त्रज्ञांच्या मते प्रगत चर भाषा अशा वृत्तीला आणि डावपेचांच्या संकल्पना मनात घोळवायला पोषक असते. हे मत कदाचित् अतिशयोक्त असू शकेल. भाषेची समृद्धी, आणि ज्यातून संस्कृतीची यथार्थ अभिव्यक्ती होते असे मानवी व्यवहार यांच्या परस्परसंबंधांची दखल किती तीव्रतेने घेतली जात आहे याचा पुरावा म्हणून हे सारे विवेचन उपयुक्त ठरेल. आणि या पार्श्वभूमीवर आपले भाषाविषयक धोरण किती सपशेल चुकलेले आहे याची कल्पना येईल.

**साधने दिली की प्रगती होतेच**

हे सारे विवेचन केवळ सैद्धांतिक नाही. त्याला अनुभवाचा आधार आहे. गेली पंधरा वर्षे होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्राने, विज्ञानशिक्षण सुधारण्यासाठी काही कृतिसंशोधन प्रकल्प हाती घेतले. या प्रकल्पांचे सविस्तर अहवाल संस्थेतर्फे प्रसिद्ध करण्यात आले आहेत. प्रकल्पांतील काही निष्कर्षांचा उल्लेख करणे उद्बोधक ठरेल. एका प्रकल्पात, मुंबई महापालिकेच्या शाळांत शिकणाऱ्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढवण्याचा प्रयत्न करण्यात आला. महापालिकेच्या आठ शाळांतून इयत्ता आठवीत शिकणाऱ्या चाळीस विद्यार्थ्यांची निवड करण्यात आली. हे विद्यार्थी आठवड्यातून एकदा, सुमारे अडीच ते तीन तास होमी भाभा केंद्रात येत. म्हणजेच संपूर्ण शालेय वर्षात त्यांचा आणि आमचा संपर्क सुमारे शंभर तास एवढा मर्यादित होता. इतक्या थोड्या वेळात गणित, विज्ञान आणि इंग्रजी हे सर्व विषय मुळापासून शिकवणे केवळ अशक्यच होते. म्हणूनही, ज्ञानार्जनाची साधने द्यावीत, संकल्पना स्पष्ट होण्याच्या प्रक्रियेत गैरसमजुतीचे काही अडसर असल्यास ते दूर करावेत असे ठरवले. इंग्रजी आणि मराठी उतारे वाचून त्याचे सार काढण्याचे कौशल्य विकसित करण्याचे प्रयत्न केले. गणित आणि विज्ञानात चर्चा पद्धतीने सिद्धांतांचे मर्म समजावून दिले. प्रयोगशाळेतही विद्यार्थ्यांनीच प्रयोगातून निष्कर्ष काढावे असा आग्रह धरला जाई. हळू हळू विद्यार्थ्यांची आकलनशक्ती वाढली. वाचनाची गोडी लागली. संपूर्ण पुस्तकाचे (वाचनालयातील) थोडक्यात सार सांगता येऊ लागले. अशा प्रकारे ज्ञानार्जनाची साधने सिद्ध झाल्यावर, या विद्यार्थ्यांनी शालांत परीक्षेत किती घवघवीत यश मिळवले ते पहा. यासाठी चार आलेखांद्वारे प्रकल्पातील मुलांचे गुण आणि ज्या आठ शाळांतून ही मुले निवडली होती त्या आठ शाळांतील सर्व विद्यार्थ्यांनी मिळवलेले गुण यांची तुलना करून पाहिली आहे. हे आलेख इतके बोलके





अनुक्रमणिका

आहेत की त्यावर भाष्य करण्याची गरज नाही. फक्त दोन गोष्टी नमूद केल्या पाहिजेत. इयत्ता आठवीत निवड झाली तेव्हा या मुलांची गुणवत्ता इतर सरासरी विद्यार्थ्यांसारखीच होती. तसेच एकूण चार तुकड्यांवर हा प्रयोग करण्यात आला. चारही वेळा असेच स्पष्ट यश आले.

मुलांनी प्रश्न विचारावेत, आपले मत मांडावे, प्रसंगी शिक्षकाशी वाद घालावा हे सारे बोलायला ठीक आहे. परंतु विद्यार्थ्यांचे बोलण्याचे कौशल्य, आणि विद्यार्थ्यांनी व्यक्त केलेल्या मतातील त्रुटी नेमक्या हेरून विद्यार्थ्यांना पुन्हा विचार करायला लावेल असे प्रत्युत्तर देण्याचे शिक्षकाचे कौशल्य गृहीत धरून हे मत मांडण्यात येते. ही दोनही कौशल्ये प्रयत्नाने जोपासावी लागतात. आमच्या प्रकल्पाचा एक महत्त्वाचा निष्कर्ष असा की ही कौशल्ये विकसित केल्यावर शिक्षक आणि विद्यार्थी यांचा सुसंवाद वाढतो, अर्थपूर्ण होतो, आणि वर्गातील चर्चा आकर्षक आणि ज्ञानलक्षी होते.

### वैज्ञानिक दृष्टिकोन आणि अंधश्रद्धानिर्मूलनाचे कार्य

समाजात वैज्ञानिक दृष्टिकोन रुजला पाहिजे ही जाणीव आता फार निकडीत भासत आहे. भोळसट प्रवृत्ती, अंधश्रद्धा इत्यादींचा पाडाव करण्याचा कित्येक संस्थांनी आणि व्यक्तींनी चंग बांधला आहे. ही फार आनंदाची गोष्ट आहे. ज्या प्रश्नांची विज्ञानाने उकल केलेली आहे अशा प्रश्नांनबाबतही काही जुन्या, कालबाह्य आणि घातुक समजुतींवर बहुजनसमाज आणि उच्चपदस्थही विसंबून राहतात ही खरोखरीच चिंताजनक बाब आहे.

कोणत्याही लढाईत, अज्ञानाविरुद्धच्या लढाईतसुद्धा राग आवरला पाहिजे. निष्कर्ष काढणे, कार्यकारणभाव तपासून पाहणे वगैरे कौशल्यांची ज्याला तोंडओळखही नाही, अशा व्यक्तीसमोर माझा निष्कर्ष अधिक बिनतोड आहे, असा दावा केल्यावर, ती व्यक्ती निर्णय काय देणार ? पुष्कळदा असाही अनुभव येतो की प्रयोग करून दाखवले तरी फारसा उपयोग होत नाही. बुवाबाजीमध्ये ज्या प्रयोगांनी अडाणी समाजावर छाप पाडली जाते, तेच प्रयोग वैज्ञानिकांनी करून दाखवले तरी बुवाबाजी नष्ट होतेच असे नाही. कधी कधी खेडूत त्या वैज्ञानिकालाच भाबडेपणाने दंडवत घालून त्यांनाही ‘ बुवाचा दर्जा ’ बहाल करतात ! नेहमीच्या दैनंदिन व्यवहारातल्या गुंतागुंतीच्या अनुभवाच्या जागी स्पष्टता आणणारा अनुभव देणे हे प्रयोगाचे उद्दिष्ट आहे. असे प्रयोग सातत्याने होत राहिले तरच प्रयोगाच्या अनुभवातून त्या अनुभवाचा अर्थ लावण्याची कुवत निर्माण होते. नाहीतर प्रयोग म्हणजे एक प्रकारचे जादूचे खेळच वाटतात.

समस्यांची उकल करण्यासाठी प्रयोग करायचे असतात, संशोधनातून मार्ग

सापडतो अशी आमची पक्की धारणा नाही. ज्ञानसंक्रमण म्हणजे शिक्षण परिणाम-कारक कसे होईल याबाबतीत प्रयोग करण्याची आवश्यकता आहे. बहुजन समाजाची मते कशी व का बनतात याचा शोध घेतला पाहिजे. चुकीच्या संकल्पना कशा तयार होतात ते कळल्यावर त्या दूर करण्याचा उपाय शोधणे शक्य होईल. केवळ प्रचाराने अंधश्रद्धांचे निर्मूलन होणार नाही. अंधश्रद्धानिर्मूलनाच्या कार्यक्रमाला वैचारिक अधिष्ठान लाभावे असें वाटत असेल, तर अशा प्रकारचे संशोधन व्हायला पाहिजे. चर्चा, सप्रयोग व्याख्याने हे सर्व कार्यक्रम आवश्यक आहेतच. संशोधन पुरेसे होईपर्यंत तें थांबवायचे नसतात. पण चळवळीला वैचारिक अधिष्ठान नसेल तर ती रुजत नाही. म्हणून या चळवळीतील प्रज्ञावंतांनी केवळ कार्यक्रमात गुंतून न पडता प्रश्नाचे मूळ शोधण्याचा प्रयत्न करावा. अन्यथा एखाद्या पुण्यात्म्याने आपली उभी हयात रस्ते झाडण्यात घालविली, तरी समाजाला स्वच्छतेचे धडे मिळत नाहीत हाच अनुभव पुन्हा पुन्हा येईल.

**शास्त्रीय विचार व्यक्त करणारी मराठी**

नवीन वैज्ञानिक विचार मराठीतून करता यावे असे वाटत असेल, तर ते व्यक्त करण्यासाठी एक काटेकोर, अचूक, निश्चित अर्थवाही अशी भाषा तयार करावी लागेल. सुदैवाने पारिभाषिक शब्द तयार करण्याचे काम जवळ जवळ पूर्ण झाले आहे. त्यात वारंवार भर घालावी लागेल. परंतु आता पारिभाषिक शब्द ही समस्या उरलेली नाही. काटेकोर आणि निश्चित अर्थवाही भाषा मात्र निर्माण व्हायला हवी. कारण अशा भाषेच्या अभावी विचारातच भोंगळपणा येतो.

ज्या गोष्टी मानवाच्या मध्यस्थीशिवाय घडतात त्यांचे वर्णन आणि ज्यात मानवी मध्यस्थीची अपरिहार्यपणे आवश्यकता असते अशा गोष्टींचे वर्णन यात वाक्यरचनेतील फरक अभिप्रेत आहे काय ? इंग्रजीत कर्मणी प्रयोग वापरून काही गोष्टी साधतात. मराठी प्रयोगांची संकल्पनाच भिन्न आहे. दोन नकारात्मक शब्द केव्हा वापरावेत ? या आणि अशा प्रश्नांना आता हात घातला पाहिजे. "माझा मराठाचि बोल कौतुके, अमृताते पैजा जिंके" अशी घोषणा करून भागणार नाही. किचकट, गुंतागुंतीच्या संकल्पना यथार्थपणे (भावार्थपणे नव्हे) व्यक्त करून दाखवाव्या लागतील, तरच भाषा खऱ्या अर्थाने समृद्ध होऊन नवविचारांची गंगोत्री म्हणून उदयाला येईल. हे काम एकट्यादुकट्याचे नाही. त्यासाठीं महाराष्ट्रातील विविध क्षेत्रांतील विचारवंतांना एकत्र यावे लागेल, न भांडता नांदावे लागेल.

**संदर्भ** : 'स्वतंत्र भारतातील शिक्षणाचे नियोजन : यश आणि अपयश' प्राचार्य बी. एन्. वैद्य स्मृति व्याख्यान, इंडियन एज्युकेशन सोसायटी, मुंबई (१९८४. १०–

(पृ. ४० वर तळाशी)

## जाता जाता

उत्तर अमेरिकन वृत्तपत्रातून पत्रोत्तरांचा स्तंभ लिहिणाऱ्या ॲन लँडर्स या बाईच्या स्तंभात एका वाचकानं एक अनामिक कवीची कविता पाठवली होती. गोरे लोक काळ्यांना काळे म्हणण्याऐवजी जेव्हा 'कलर्ड' (रंगवलेला, रंगीत) म्हणत तेव्हा बऱ्याच जणांना ते आवडत नसे, त्या भावनेतून निघालेला हा उद्गार.

## हे कसं ?

जन्मलो तेव्हा मी काळा होतो,
वाढलो, तेव्हाही मी काळाच होतो,
आजारी पडतो, तेव्हा मी काळाच असतो,
उन्हात फिरलो, तरी मी काळाच राहतो,
आणि मेलो तरी मी काळाच उरतो.
पण तू...
जन्मलास तेव्हा तू गुलाबी होतास,
वाढलास, तेव्हा तू गोरा झालास,
आजारी पडलास
की तू हिरवापिवळा पडतोस,
उन्हात गेलास की लालबुंद होतोस,
थंडीत काळानिळा होतोस,
आणि मेल्यावर जांभळा.
आणि इतकं असून तू मलाच 'कलर्ड' म्हणतोस ?

अनुवाद : विद्युल्लेखा अकलूजकर, रिचमंड, ब्रिटिश कोलंबिया, कॅनडा.

---

(पृ. ३९ वरून)
११) (छेदक २, ३, ४, ५); 'विज्ञान शिक्षण आणि वैज्ञानिक समाज', अध्यक्षीय भाषण, अखिल भारतीय मराठी विज्ञान संमेलन, २३ वे अधिवेशन, चाळीसगाव (१९८८. १२-२५) (छेदक १, ६, ७, ८, ९, १०).

**होमी भाभा विज्ञान शिक्षण केंद्र, टाटा इन्स्टिटयूट ऑव्ह फंडामेंटल रीसर्च, मुंबई ४०० ००५**

# अर्थाविना शब्द नि शब्दाविना अर्थ

## पॅट्रिक झ्युसकिंड

पॅट्रिक झ्युस्किंड नावाच्या जर्मन भाषक लेखकानं **डास पारफुम** (द परफ्यूम) नावाची एके कादंबरी लिहिली. ती 'बेस्टसेलर' यादीमध्ये मोडते. या कादंबरी-तल्या मुख्य पात्राला, ग्रेन्युईला अतिमानुष गंधज्ञानाची अद्‌भुत देणगी लाभलेली होती. त्यामुळे तो लोकांना मोहून टाकणारे आणि अनाकलनीय असे पर्फ्यूम तयार करायचा. (त्यासाठी तरुणींचे घाम, त्यांचे केस या गोष्टी त्याला लागायच्या म्हणून तो त्यांचे खून करायचा. अशी ही एक अनोखी रहस्यकथा आहे.)

या व्यक्तिचित्रणामध्ये भाषेच्या अभ्यासकाच्या दृष्टीने लक्ष वेधणारा भाग म्हणजे त्याची भाषा शिकण्याची प्रक्रिया आणि भाषा वापरण्याची क्षमता.

भाषा आणि विचार यांची सांगड तर अशी घातली गेली आहे, की भाषेशिवाय विचार नाही आणि विचाराखेरीज भाषा नाही, हे आपल्याला विदितच आहे. ज्याचा आपण शब्दाने उल्लेख करू शकत नाही, शब्दानं ज्याला नाव देऊ शकत नाही ते 'असतंच' नाही. त्याचं अस्तित्वच सिद्ध होत नाही असं कवी आणि तत्त्ववेत्त्यांनी म्हटले आहे. – पण तरीही ते असतं ! आपण अनुभवू शकू किंवा कल्पू शकू, त्या पलीकडेही जग असतंच. अशी कोणतीही भाषा इतकी समृद्ध नाही, जिच्यात हे जग संपूर्णपणें व्यक्त होऊ शकेल. संपूर्ण सत्याचा काही भागच प्रत्येक भाषेत शब्दांकित होऊ शकतो – आणि तोही प्रत्येक भाषेत वेगळ्या रीतीने. प्रत्येक भाषेची वास्तवाचे विभाजन आणि विभाजित तुकडयांचे वर्गीकरण करायची आपली पद्धत असते; प्रत्येक भाषेचे कशाला काय म्हणून संबोधायचे याचे आपले ठराव असतात.

मराठीत समजा आपण रंगाच्या सलग पट्टयाचे सहा भाग मानले असले, तर दुसऱ्या कोणा एका भाषेमध्ये कदाचित् तीन भाग मानलेले असतील. म्हणजे असं,

| | | | |
|---|---|---|---|
| तांबडा | | | 'तांबडा' |
| नारिंगी | मराठी रंगपट्टा | 'क्ष' भाषेतील रंगपट्टा | 'निळा' |
| पिवळा | | | 'पिवळा' |
| हिरवा | | | |
| निळा | | | |
| जांभळा | | | |

की भाषेमध्ये पिवळा+तांबडा, पिवळा+निळा किंवा निळा+ तांबडा या मिश्रणांसाठी वेगळे भाग पाडून वेगळी नावं दिलेली नसतील. त्या कल्पनागृहीत भाषासमाजामध्ये लोक ढोबळ मनाने तीनच स्वतंत्र रंग ओळखत असतील.

खरं तर मराठीत आपण निरनिराळ्या प्रमाणात केलेल्या रंगांच्या मिश्रणांना निरनिराळ्या शब्दांनी ओळखतो. उदा. नारिंगी, केशरी, शेंदरी, चितामणी, आकाशी, गुलाबी, विटकरी, तपकिरी इत्यादी. तरीही मराठीत शब्दांकित न केलेले रंग आहेतच. (beige, mauve इत्यादी.) आणि ज्यांच्या अस्तित्वाचीच जाणीव नव्हती असे सुरुवातीला कोणत्याच भाषेत शब्दांकित न झालेले 'रंग' आहेतच. – Infra red आणि ultra voilet सारखे किंवा न जाणो – अजूनही असतील ! म्हणून जग आणि सत्य हे अनुभवाच्या, विचाराच्या पलीकडचं आहे आणि संपूर्ण अनुभूत जग भाषेत व्यक्त किंवा शब्दांकित होत नाही. आणि दोन भाषेतलं शब्दांकित जग 'ते'च आणि 'तस्संच' नसतं.

इंग्रजीत प आणि फ हे एकमेकांपासून वेगळे ओळखले जात नाहीत, म्हणून या ध्वनींना इंग्रजीत वर्ण म्हणून वेगवेगळं अस्तित्व नाही. तसंच काही इथं होतंय. ज्या अनुभवांच्या तुकड्यांची स्वतंत्र ओळख पटते, तेच शब्दांकित होतात. ज्यांची स्वतंत्र ओळख पटत नाही, त्यांना शब्दाने स्वतंत्र नाव देण्याचा प्रश्नच उद्भवत नाही.

हेच नेमकं ग्रेन्युईच्या बाबतीत घडतं. ज्या समाजाचा तो घटक आहे, त्या समाजाच्या अनुभवविश्वापलीकडे ग्रेन्युईचं अनुभवविश्व आहे तो वासा-वासात जे सूक्ष्म फरक करू शकतो व पुन्हा पुन्हा तेच ते वास म्हणून ओळखू शकतो, त्यांसाठी भाषांमध्ये अभिव्यक्तीच्या साधनाची, शब्दांची सोय नाही. त्यामुळे तो समाजातल्या इतर घटकांबरोबर भाषाव्यवहार करू शकत नाही. पक्षिनिरीक्षणासाठी गेल्यावर सवयीने हळूहळू निरनिराळे पक्षी दिसायला लागतात. आणि ही 'चिमणी' त्या 'चिमणी'हून वेगळी आहे, असं लक्षात येतं. इथे बघितलेला पक्षी चिमणीपेक्षा लहान आहे आणि त्याच्या पांढऱ्या पोटावर उभी काळी रेघ आहे. तो दुसरा चिमणीपेक्षा जरा मोठा आहे आणि सारखा शेपटी हलवतो आहे. आणि पुढे जाता ते परत दिसल्यावर – जरा आपल्याला त्यांची नावं माहीत नसली तरी – आपण ओळखतो, 'हा' तो त्या दिवशी बघितलेला. मग त्यांना आपण आपल्या सोयीसाठी 'क्ष' किंवा 'य' किंवा 'लाल मानेचा', 'पिवळ्या पोटाचा' अशी नावं देतो आणि या विषयात रस असलेल्या आणि त्यावर बोलणाऱ्या इतर लोकांना भेटल्यावर आपल्याला कळतं, की आपण ज्याला 'क्ष' म्हणत होतो, तो इंग्रजीतला 'टिट्' किंवा 'य' म्हणत होतो, तो मराठीतला 'सुतार.'

पण आपले अनुभव आपण समाजाबरोबर शेअर करू शकत नसलो आणि शब्दांकित करू शकत नसलो, तर काय होईल, हे आपल्याला ग्रेन्युईच्या व्यक्ति-

चित्रणावरून लक्षात येतं. (या 'शेअर करण्या'च्या अनुभवाचं मराठीत काय करायचं ?)

'भाषा आणि जीवन'च्या वाचकांना आणि भाषेच्या अभ्यासकांना रंजक वाटेल, असा डास पारफुम कादंबरीतला व्यक्तिचित्रणाचा भाग भाषांतरातून पुढे दिला आहे.

"पाय लांब करून ग्रेन्युई त्या ढिगावर बसला होता. पाठ खोपटाच्या भिंतीला टेकून, डोळे मिटून शांत बसला होता. अजिबात हालचाल न करता. त्याला काही दिसत नव्हतं, ऐकू येत नव्हतं, की जाणवत नव्हतं. तो फक्त त्या लाकडाचा गंध शोषून घेत होता. तो गंध त्याच्याभोवती पसरत होता. तो गंध त्या छपराखाली भरून राहिला होता. ग्रेन्युई तो गंध पीत होता. त्यात तो बुडून गेला होता. रंध्रारंध्रातून तो गंध शोषून घेऊन तो स्वतःच लाकूड बनून गेला होता — लाकडी बाहुलीसारखा; एखाद्या 'पिनोचिओ'सारखा. तो लाकडाच्या ढिगाऱ्यावर तसाच निपचित पडून राहिला, मेल्यासारखा. मग बऱ्याच वेळाने — अर्ध्या तासाने त्याने तोंडातून पिळवटून, कसाबसा एक शब्द उच्चारला : 'लाकूड'. तो जसा काही डोक्यापर्यंत लाकडाने भारला गेला होता. लाकूड हा शब्द जसं काही त्याच्या घशाशी आला होता. जसं काही त्याचं पोट, घसा, कान लाकडाने तुडुंब भरलं होतं — मग 'लाकूड' हा शब्द तो ओकला. तो भानावर आला. वाचला. त्या लाकडाचं दडपून टाकणारं अस्तित्व आणि त्याचा गंध यांनी ग्रेन्युई गुदमरत होता. तो उठून बसला आणि ढिगावरून घसरून खाली आला. आणि आपल्या लाकडी पायावर अडखळत तिथून निघून गेला. कित्येक दिवसानंतरही त्याचं मन त्या वासानं भारावलेलं होतं. त्या वासाची जबरदस्त आठवण आली, की तो स्वतःशीच पुटपुटायचा : 'लाकूड', 'लाकूड'.

"अशा रीतीने तो बोलायला शिकला, पण शब्द जेव्हा एखाद्या वस्तूला उल्लेखून म्हटलेले नसायचे; म्हणजे अमूर्त कल्पना व्यक्त करणारे असायचे, तेव्हा त्याची फारच पंचाईत व्हायची. विशेषतः नैतिक किंवा तत्सम अशा संकल्पनांसाठी वापरलेले शब्द अशा वेळी त्याच्या लक्षात रहायचे नाहीत. तो त्यात गोंधळ करायचा. त्यांची अदलाबदल करायचा. मोठा झाल्यावरही तो असे शब्द वापरण्याचं टाळत असे. आणि वापरलेच, तर त्यात चुका करीत असे. हक्क, विवेक, देव, आनंद, जबाबदारी, नम्रता, कृतज्ञता हे असे शब्द — यांतून काय व्यक्त होत असावं, हे त्याला कायमचं कोडंच होतं.

"तसं बघितलं, तर त्याच्या डोक्यात साठलेल्या आणि भिनलेल्या सगळ्या वेड्या कल्पनांना शब्दरूप द्यायला त्याला वापरातली भाषा मुळीच पुरी पडू शकत नसे. अलीकडे तर त्याला नुसता लाकडाचा वास यायचा नाही, तर लाकडाच्या प्रकारांचा वेगवेगळा वास यायचा. उदाहरणार्थ : जुन्या, नव्या, शेवाळलेल्या,

कुजलेल्या, कुबट लाकडाचा वास. किंवा लाकडाच्या फळ्यांचा, भुग्याचा, कपाटांचा त्याला बरोबर वास येत असे. आणि वासा-वासात तो बरोबर फरक करू शकत असे. लाकडाप्रमाणे इतर गोष्टींबाबतही असंच होतं. म्हणजे उदाहरणार्थ : सकाळी उठल्यावर मादाम गिय्यार्ड जे एक पांढरं पेय मुलांना आणून देत असे, त्याला सगळे आपले सरधोपट 'दूध' म्हणायचे. ग्रेन्युईच्या मते ते पेय खरं तर प्रत्येक दिवशी वेगळंच लागायचं. ते किती गरम आहे, कोणत्या गाईचं आहे, गाईनं आदल्या दिवशी काय खाल्लं होतं, त्यात चिकणाई किती आहे, इत्यादी गोष्टींवर ते अवलंबून असे. आणि तीच गोष्ट धुराचीही. ज्यात शेकडो सुगंध मिसळले आहेत असं चमचमणारं, क्षणोक्षणी नवीन रूप धारण करणारं हे वासांचं मिश्रण, त्याला आपलं आगीतून उठणाऱ्या धुराप्रमाणे 'धूर' हे एकच नाव ! तसंच पावलो-पावली, श्वासागणिक वेगवेगळ्या वासांनी भरून जाणारी ही पृथ्वी–माती, निसर्ग, हवा, वासांमुळे त्यांच्या संपूर्ण व्यक्तित्वाचा बदल होतो, तरीही त्यांना आपली पृथ्वी, निसर्ग, हवा अशीच सरधोपट नावं असावी, म्हणजे कमाल आहे भाषेची! ही मर्यादित कुवत, हे दारिद्र्य, आणि वासातून प्रचीती येणाऱ्या जगाचं हे ऐश्वर्य, ही संपन्नता यांच्यातल्या तफावतीमुळे, यांचा मेळ घालणं अशक्य असल्यामुळे, ग्रेन्युईला भाषा या प्रकारात काही तथ्य नाही, असंच वाटायला लागलं. इतर माणसांमधे वावरताना जेव्हा नाइलाजच होईल, तेव्हाच तो भाषेचा वापर करण्याची तसदी घ्यायचा. गंधाच्या माध्यमातून त्यानं स्वतःभोवतीचं संपूर्ण जग तो सहा वर्षांचा असतानाच आत्मसात् केलं होतं. मादाम गिय्यार्डच्या घरामधे एकही वस्तू अशी नव्हती, उत्तरेकडच्या न्यु द शारॉन या रस्त्यावरील एकही जागा, व्यक्ती, दगड, झाड, झुडूप, कुंपण, एकही जमिनीचा तुकडा असा नव्हता, की ज्याचा वास त्याला माहीत नव्हता किंवा तो त्यांना वासावरून पुन्हा ओळखू शकला नसता.

"त्या वस्तूंच्या वासाच्या आठवणी त्याच्या डोक्यात पक्क्या बसलेल्या होत्या. हजारो, लाखो वेगवेगळे स्वतंत्र वास त्याने डोक्यात (एकेका कप्प्यात) साठवले होते, आणि इतक्या नेमकेपणाने की केव्हाही त्यांच्यापैकी वास आला, तर – तो तो लगेच ओळखत असे. किंवा एखाद्या वासाच्या नुसत्या आठवणीने त्याला तो वास 'प्रत्यक्ष' येत असे. कल्पनेतच तो त्यांची वेगवेगळी मिश्रणं करून नवीन वास तयार करायचा. असे वास, की जे प्रत्यक्षात खरं तर अस्तित्वातच नाहीत.

"जणू काही वासाच्या संबंधीत त्याची स्वतःची स्वतः वसवलेली अशी प्रचंड मोठी शब्दसंपत्ती होती. त्यांची तो जणू मन मानेल तशी वाटेल तेवढी गंध – वाक्य बनवायचा, आणि तेही अशा लहान वयात. त्याच्या बरोबरची मुलं शिकलेल्या शब्दांची मोठ्या कष्टाने अडखळत रूढ वाक्यं बनवत. बाह्य जगाचं चित्रण

करायला असमर्थ अशी वाक्यं..."

संदर्भ : Patrick Susskind, 'Das Parfum : Die Geschichte eines Morders (सुगंध : एका खुन्याची हकिगत), Zurich : Diogenes Verlag, 1985, Pages 30-35. पत्रिकेच्या वाचकांना पीटर बिक्सेलची 'टेबल म्हणजे टेबल' ही जर्मन कथा आठवावी – भाषा आणि जीवन २ : ४ दिवाळी १९८४.

अनुवाद आणि प्रस्तावक : नीति बडवे, आधुनिक युरोपीय भाषा व जपानी भाषाविभाग (पुणे विद्यापीठ), रानडे इन्स्टिटयूट परिसर, पुणे ४११ ००४

---

वचनवेध

# 'अं' मधील वडीलधारा आदर

## पंडित आवळीकर / विजया तेलंग

मराठी व्यक्तिनामांत काही वेळा विशिष्ट प्रकारे अनुस्वार येतो. तो नुसता उच्चारित नसतो तर एका प्राचीन प्रत्ययाचा अर्थपूर्ण अवशेष असतो. अशी काही व्यक्तिनामे म्हणजे : भिकंभट, पिलंभट, दत्तंभट, बाळंभट या नावांतील अनुस्वारात 'अं' / 'अम्मा' हा प्राचीन कन्नडमध्ये वापरला गेलेला आणि आजही 'अम्मा'च्या रूपाने प्रचारात असलेला शब्द आहे. गुंडम (प्रभू), अल्लम (प्रभू) या नावांत हा 'अं' आहे हे सांगताना शं. बा. जोशी म्हणतात : " नवव्या–दहाव्या शतकातील कानडी काव्यात अम्म हा शब्द आर्य किंवा तात अशा अर्थाने वापरलेला आहे... आधी पुं–स्त्रीलिंगी असलेला अम्म शब्द अर्वाचीनकाळी त्यातील अर्थ संकुचित होऊन केवळ स्त्रीलिंगी बनला आहे."[१] 'पंपभारतं', 'विक्रमार्जुनविजयं' या हळेगन्नड महाकाव्यात 'अम्म' हा शब्द आलेला आहे.[2] त्याचा अर्थ संपादकांनी 'तंदे' (= वडील, बाप) असा दिलेला आहे. शं. बा. जोशींनी (आणखी) म्हटले आहे तसा 'अम' हा राव, पंत वगैरेप्रमाणे सन्मानार्थी शब्द मानला तरी त्यातून वडीलधारा आदर व्यक्त होतो. कोल्हापूरजवळच्या ग्रामीण परिसरात परवा परवापर्यंत 'बाळू', 'शंकर' या नावाची 'बाळुम्मा' 'शंकरुम्मा' ही रूपे रूढ होती. 'अं' लुप्त झाल्यावर आदरदर्शक 'ओ' प्रकट झाला असावा. राघो, दत्तो, मोरो, चिंतो, रंगो, मालो या 'ओ'कारांना 'बा', 'पंत', 'जी' या प्रत्ययांनी अधिक प्रतिष्ठा मिळवून दिली असावी.

१. शं. बा. जोशी, मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९८०, पृ. १५०.

२. पंपभारत, (सं.) के. व्ही. पुट्टप्प, मैसूर विश्वविद्यालय, १९७७, (९-५४-११-७३).

मराठी विभाग, कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड ५८० ००३

# एक एक जो शब्द नवा तू शिकसी

नीलिमा गुंडी

साधारणतः दीड ते अडीच वर्षे वयाच्या अवधीत भाषेतील नवीन शब्द आपलेसे करून घेण्याची माझ्या मुलीची धडपड पाहताना मलाच माझ्या भाषेचे नव्याने भान येत आहे. या भाषेत शब्दांचे उच्चार कधी आणि का वेगळे होतात; एका शब्दाचे दुसऱ्या शब्दाशी उच्चारदृष्ट्या साम्य कसे आहे व त्यामुळे संदर्भाचा रोख एकीकडून दुसरीकडे कसा जाऊ शकतो; अशी काही वैशिष्टये तिच्यामुळे मला जाणवू लागली आहेत.

नव्याने शिकावयाचा शब्द मनात घट्ट रुजवताना मुलीची पद्धत अशी की तो शब्द त्याला जवळच्या परिचित शब्दाशी आधी ताडून पाहायचा. त्यातला फरक जाणून घ्यायचा, आणि मग प्रत्येक शब्दाचे अर्थानुसार तिच्या मनात वेगवेगळे कप्पे होत असावेत.

तिला पहिल्यांदा जेव्हा '"शुभं करोति कल्याणं" म्हण–' असे सांगितले तेव्हा "शुभं करोति" या शब्दानंतर स्वतःहून एकदम म्हणाली, "आजी कल्याणला (तिची आजी कल्याणला राहते, हे तिला तोपर्यंत माहीत झालेले होते.) अशी 'कल्याणं'ची तिला ओळखीच्या असलेल्या 'कल्याण'शी तिने आधी गाठ घालून दिली.

परत तिला म्हटलं की दिवाण बुटका आहे. 'बुटका' हा शब्द ती तेव्हा प्रथमच ऐकत होती. तर एकदम ओरडलीच, "बूट!" मलाच पटकन कळेना. मग लक्षात आलं की 'बुटका' या शब्दात 'बूट' शब्द लपलेला आहे! तिचे हे असे एका शब्दावरून दुसऱ्या शब्दावर उड्या मारणे सुरू झाले की वाटतं, साहित्यातली संज्ञाप्रवाहाची– घरंगळत्या जाणिवांचे दुवे नादांतून जोडण्याची प्रवृत्ती इतकी प्राथमिक आहे तर!

एकदा असे शब्द ताडुन अर्थ जाणून वेगळे लक्षात ठेवल्यावर मात्र अर्थाबाबत ती विशेष जागरूक असते. आपला प्रत्येक शब्द अगदी अर्थदृष्टया धारेवर धरणार! 'गवत हिरवंगार आहे' म्हटल्यावर, म्हणणार 'कुठे गार आहे बघू' आणि हात लावायला निघणार! 'फुलपाखरू' दाखवल्यावर पहिली प्रतिक्रिया अशी, 'फूल नाही, नुसतं पाखरू' म्हणजे त्या शब्दाची अर्थदृष्टया चिरफाडच! इतकंच काय, तिच्या बाबांना मी 'बाबा' अशी हाक मारणे अर्थदृष्टया चूक, त्यामुळे "ए, तू

(पृ. ४८ वर पहा.)

# एका पुस्तकाची जन्मकथा

## सुभाष शंकर भागवत

(लेखकाने 'जेनरल पॅथॉलजी फॉर व्हेटिरिनरी मेडिसिन' या विषयावर विद्यार्थ्यांसाठी **सर्वसाधारण पशुरोगविज्ञान** हे पुस्तक (अकोला : लेखक, १९८६) लिहिले आहे. 'लेखकाचे मनोगत'मधून, पृ. ७–८ वर)

असे पुस्तक मराठीतून न लिहिता इंग्रजीतून लिहिले असते तर आर्थिकदृष्टचा अधिक किफायतशीर ठरले असते. तरी ते मराठीतून लिहिण्यामागे (प्रेरणा म्हणजे) प्राध्यापकीय जीवनात विद्यार्थ्यांना मूळ इंग्रजी ग्रंथांचें वाचन–ग्रहण करताना येणाऱ्या अडचणीची जाणीव...

हे पुस्तक म्हणजे कोणत्याही एका इंग्रजी पुस्तकाचा अनुवाद नव्हे, हे लेखकाने मूळातून केलेले संपूर्ण मराठी लेखनही नाही. गेल्या दहा–पंधरा वर्षांमध्ये महाविद्यालयात शिकवत असताना तयार केलेल्या मूळ खाजगी इंग्रजी टिप्पणांचा मराठी अनुवाद (शासनात भाषाधिकारी असलेली माझी पत्नी डॉ. गीता भागवत हिच्याकडून) करून घ्यावयाचा व तो तपासायचा, अभिप्रेत अर्थ नेमका उतरावा म्हणून त्यावर...संस्करण करून घ्यावयाचे. अशा प्रक्रियेद्वारा सुरुवातीचा बराचसा भाग लिहिला गेला आहे. काही वेळा चर्चा करून अनुवादकाला विषय समजावून देऊन मराठीत मजकूर लिहून घ्यावयाचा व मग त्यावर संस्करण करावयाचे अशी पद्धत अवलंबिली आहे. पुढे पुढे काही प्रकरणे मूळातून मराठीतच लिहिणे व नंतर पत्नीकडून भाषादृष्टचा संस्करण करून घेणे अशी लेखनपद्धती उपयोजिली आहे. एकंदरीत इंग्रजी टिप्पणांचा मराठी अनुवाद, व्यक्तिगत इंग्रजी–मराठी मिश्र कथनाचे मराठीतून शब्दांकन आणि मूळ मराठी लेखन अशा संमिश्र प्रक्रियांचा परिपाक म्हणजे हे पुस्तक आहे.

...ह्या...विषयात पारंगत होण्यासाठी त्या विषयावरील वेगवेगळे ग्रंथ मूळातूनच वाचणे इष्ट असते. म्हणूनच प्रस्तुत ग्रंथातील विवेचनाद्वारें मिळणारे ज्ञान अशा... ज्ञानाशी बरोबरी करू शकेल असा लेखकाचा दावा नाही. मात्र असें असले तरी सुबोध मातृभाषेतून मांडलेला गहन विषयही चटकन् व सुलभतेनें आकलन होतो हेही तितकेच खरे. म्हणूनच मराठीतून लिहिण्याचा हा प्रपंच.





अनुक्रमणिका

(मराठी पुस्तक वाचून नंतर इंग्रजीतील विविध ग्रंथांकडे वळल्यास विद्यार्थ्यांना त्या इंग्रजी ग्रंथांपासून अधिक लाभ होईल असा लेखकाचा अभिप्राय दिसतो. ग्रंथलेखनाची प्रक्रिया द्वैभाषिक. तशीच ज्ञानग्रहणाची प्रक्रियाही द्वैभाषिक. पशुवैद्यकाचे बहुसंख्य विद्यार्थी ग्रामीण भागातून आलेले असतात हेंही महत्त्वाचे.

— संपादक)

**अणुजीवशास्त्र, विकृतिशास्त्र व परजीवशास्त्र पदव्युत्तर विभाग, पंजाबराव कृषी विद्यापीठ, अकोला ४४४ १०४**

---

(पृ. ४६ वरून)
बाबा काय म्हणतेस !" असं मलाच जोरात विचारणार.

एकच शब्द वेगवेगळ्या संदर्भात वेगवेगळ्या पद्धतीने उच्चारणे ही किती कसरत आहे, हेही असेच तिच्यामुळे लक्षात आले. "मला अमुक आवडतं" आणि "अमुक आवडत् नाही" या दोन वाक्यांतले 'आवडतं' आणि 'आवडत्' हे वेगवेगळे उच्चार संदर्भाप्रमाणे योग्य तेथे कसे करायचे, हे शिकण्यासाठी तिला त्या शब्दांशी झटापट करावी लागत आहे. तसेच आई आणि ती यांचा एकत्र उल्लेख 'आम्ही दोघी' आणि बाबा आणि ती यांचा एकत्र उल्लेख 'आम्ही दोघे' हा लिंगवचनाचा चकवा तिला अजून उलगडत नाही.

व्याकरणाच्या आणि उच्चाराच्या ('र' चा उच्चार येत नाही; 'कंगवा'चा उच्चार 'कनवा', 'उटणं'चा उच्चार 'उंट', 'पारवा'चा उच्चार 'पावरा' घडत आहे.) बाबतीत असे इतरहीकाही शब्दांबाबतकच्ची असलेली तिची भाषा तरीही मला महत्त्वाची वाटते. कारण भोवतालच्या वातावरणाची तिला असलेली जाणीव शेवटी त्या भाषेतूनच व्यक्त होत आहे. आज तिच्या लेखी सजीवनिर्जीव भेद नाही. याचा अनुभव तिच्या शब्दांतूनच आला. एक दिवस ती पलंगावर बसून भिंतीशी टेकून खेळता खेळता एकदम म्हणाली, "आई, भिंत माझ्याशी कट्टी करते. बोलतच नाही." वयानुरूप तिची संवेदनशीलता किती सहजपणे तरल व काव्यात्म आहे याचा प्रत्यय तिच्या 'कट्टी' या शब्दानेच मला दिला.

**६/७०, लोकमान्यनगर, नवी पेठ, पुणे ४११०३०**

# अध्यापनक्षेत्रातील पोकळी भरून काढणारा ग्रंथ

मराठी भाषा : व्यवस्थापन आणि अध्यापन. ले. चं. द. इंदापूरकर, पुणे. कॉन्टिनेन्टल प्रकाशन १९८९. एकोणीस + ४६३ पृष्ठे; मूल्य : ८५ रुपये.

## परीक्षणलेखक : आशा मुंडले

भाषाशास्त्राला अनुसरून कोणत्याही भारतीय भाषेबद्दल पुस्तक लिहायचं तर त्यापैकी इंडो आर्यन आणि द्रविडियन भाषांना एक वेगळीच अडचण आहे. त्या भाषांतून एक प्रवाह पाणिनिबद्दलचा कमीअधिक ज्ञानाचा, एक इंग्रजी भाषेतील व्याकरणज्ञानाच्या प्रभावाचा व तिसरा आधुनिक भाषाशास्त्राचा. आणि गेल्या शतकात पहिल्या दोन प्रवाहांच्या सरमिसळीतून लिहिली गेलेली पुस्तकं आणि त्याच सरमिसळीतून शिकलेल्या शिक्षकांची परंपरा याचा अनुभव अभ्यासकांना आधी येतो आणि नंतर मोठ्या वयात आधुनिक भाषाशास्त्र शिकायची संधी मिळते. त्यामुळे पाणिनीबद्दलचीही दृष्टी बदलते.

त्यामुळे संपूर्ण पुस्तक लिहिताना अडथळ्याच्या शर्यतीप्रमाणे स्थिती होते. स्वत:चेच पूर्वग्रह नकळत शिल्लक राहणार नाहीत ना याची खबरदारी घ्यावी लागते. डॉ. इंदापूरकरांनी ही अवघड जबाबदारी यशस्वीरीतीने पेलून मराठीबद्दल एक उपयुक्त आधुनिक पुस्तक निर्माण केले आहे. त्यातील विवेचन पुरेसे तपशीलवार आहे. आणि अतिसूक्ष्मात न शिरल्यामुळे जवळजवळ वादातीत अशा पातळीवरच आहे.

त्याचा मुख्य भाग प्रकरण २ पासून प्रकरण १० पर्यंतचा आहे. मराठीतील (अर्थात प्रमाणभाषेतील) वर्णव्यवस्था, स्वनिमव्यवस्था, शब्दरूपव्यवस्था, रूपगण-व्यवस्था, वाक्यव्यवस्था, नामपदबंध, क्रियापदबंध, मूलरचित वाक्ये आणि रचनांतरित वाक्ये ही ती प्रकरणे. परिश्रमपूर्वक उपलब्ध माहितीचा चिकाटीने उपयोग करून ती सिद्ध केली आहेत. ज्यांनी इंग्रजीतून भाषाशास्त्र शिकले आहे त्यांना पटावी आणि मराठीतून शिकणाऱ्यासही समजावी अशी शास्त्रीय परिभाषा हे या भागाचे वैशिष्टच. लेखक त्याबद्दल विशेष अभिनंदनास पात्र आहे.

पहिले प्रास्ताविक प्रकरण अर्थात् मोजक्या जागेत जेवढे सांगता येईल तेवढे आहे. आणि कुशल शिक्षकाला वर्गामध्ये ते बरेच विस्तारावे लागेल. समोरच्या मराठी बोलणाऱ्याचे मराठीकडे पाहण्याचे कुतूहल शास्त्रीय निरीक्षणाकडे वळावे

याकरता प्रयत्न करावे लागतील. इंदापूरकरांनी मराठीतील पूर्वसूरींबद्दल पुरेशी माहिती दिली आहे. पण नव्या भाषाशास्त्राची धारणा जास्त शास्त्रीय आहे. ते पूर्वखंडनाने नकारात्मक मदतीने सिद्ध होते आहे. त्याच्या जोडीला शिक्षकाने रुकारात्मक भूमिकेतून विद्यार्थ्यांना भाषाकुतूहलाच्या वाटेने मार्ग दाखवित आधुनिक भाषाज्ञानाकडे न्यावे लागेल.

'भाषाशास्त्राची ओळख' या विषयावर सुटसुटीत, पॉप्युलर लेव्हलचे पुस्तक अजूनही मराठीत नाही याची खंत यावेळी वाटते. आज ना उद्या इंदापूरकरांसारख्या परिश्रमी माणसाने तिकडे वळावे आणि या पुस्तकाचा 'सोबती' म्हणून वापरता येईल असे पुस्तक लिहावे असे सुचवावेसे वाटते. कारण या लेखकाची शैली अध्यापनाची बैठक असलेली आहे. स्वाध्याय आणि विवेचन यांतून शिकता येते या स्वानुभवसिद्ध विश्वासातून ती शैली वाढलेली आहे. ज्याला उत्तम शिकवता येते, त्यानेच पाठ्यपुस्तक लिहिले तरच हे शक्य होते. हा मजकूर लिहिताना अर्थात्च मला भाषाविज्ञान – वर्णनात्मक व ऐतिहासिक या डॉ. मालशे आणि इतरां-सहितच्या पुस्तकाची योग्यता नाकारायची नाही. पण ते पुस्तकही पाठ्यपुस्तका-सारखेच आहेत.

सपिर, किंवा ब्लूमफील्ड यांसारख्या स्वयंप्रज्ञ भाषातज्ज्ञांनी जेव्हा हा विषय लोकांपुढे मांडला तेव्हा मेरिडिथच्या "एन्टर दीज एनचँटेड वुडस, यू हू डेअर" या काव्यपंक्तींची आठवण झाली. मला अभिप्रेत असणारे 'ओळख' पुस्तक तसे आणि अर्थात् अजून अलिखित – मराठीपुरते तरी आहे.

इंदापूरकरांनी ज्या पुस्तकांचा प्रास्ताविकात आढावा घेतला आहे ती पुस्तके त्यांच्या विद्यार्थ्यांनी वाचली नसतानाच ते प्रस्तुत पुस्तक शिकायला सुरू करतील ही इच्छित वस्तुस्थिती आहे. पुस्तकाच्या प्रस्तावनेत डॉ. केळकरांनी ती सूचित केली आहे.

तेव्हा या प्रकरणाचा काही भाग प्रास्ताविकाऐवजी उपसंहारात हवा होता. पुस्तकाची परिशिष्टे उपयोगी आणि पुरेशी आहेत. परंतु शिक्षकांची सध्याची कुवत विचारात घेता स्वाध्यायाची संभाव्य अचूक उत्तरे कुठेतरी शेवटी जोडायला हवी होती. हे मी उपहासाने लिहित नसून खरोखरच अपेक्षा व्यक्त करते आहे.

आता राहता राहिली मराठीची अर्थव्यवस्था. यामध्ये जेवढे संशोधन उपलब्ध आहे त्याचा विचार आहे. पण मूळ संशोधनच अद्यापि बाल्यावस्थेत असल्याने या प्रकरणांना मर्यादा आहेत.

स्वभाषाशिक्षण आणि परभाषाशिक्षण ही दोन प्रकरणे ठीकठाक आहेत. प्रत्येक नव्या विद्यार्थ्याबरोबर आणि नव्या शिक्षकाबरोबर या प्रकरणांची मांडणी ज्याची त्याला वाढवावी लागेल.

वाईट एवढेच वाटते की आधुनिक भाषाशास्त्र जगभर सर्वमान्य झाले असूनही आपल्याकडील भाषाशिक्षकांनी अजूनही त्यात पुरेसे आणि मनःपूर्वक अवगाहन केलेले नाही. आपले अभ्यासक्रम – शालेय, विद्यालयीन आणि शिक्षकप्रशिक्षण पातळीवरही अजून दुभंगलेल्या – जवळजवळ १९५० पूर्वीच्याच अवस्थेत आहेत.

शिक्षणातले भाषाशास्त्राचे स्थान ठेवणीतलें केशर सणासुदीला वापरावे तितपतच आहे. म्हणून हें पुस्तक ज्या विद्यार्थ्यांच्या हातात जाईल त्यांनाही स्वतःच्या पूर्व गैरसमजातून वाट काढत काढतच याचा आस्वाद घ्यावा लागणार.

परंतु मराठीचे आधुनिक अध्यापन करण्यासाठी जे ज्ञान शिक्षकांना हवे त्यासाठी पाठ्यपुस्तकक्षेत्रात जीं पोकळी होती ती या पुस्तकाने भरून निघाली आहे. आणि अशी आशा करायला हरकत नाही की मराठी शिकवणारांची नवी पिढी या पुस्तकावर पुष्ट होऊन यापुढे शिकणाऱ्यांचा मार्ग सोपा करील.

सरतेशेवटी ग्रंथविषयाशी संबंधित नसलेला पण मला फार आदरपूर्वक जाणवलेला एक मुद्दा मांडते. तो असा की, अभ्यासाची आवड, शिकवण्याची आवड आणि शिकवण्यासाठी पाठ्यपुस्तकांची निर्मिती करणे हे शिक्षकांचेच कर्तव्य आहे याची जाणीव, असे तीन गुण डॉ. इंदापूरकर यांच्यामधे एकवटले आहेत. हा संगम विद्याक्षेत्रात दुर्मिळ आहे.

मूलभूत संशोधन "मानाचे" या समजुतीनें अनेकजण पाठ्यपुस्तके लिहिण्याचे टाळतात व संशोधनात "निमग्न" राहतात. परंतु सर्वांच्याच दुर्दैवाने अनेकदा ते संशोधन नसून "संशोधन नावाच्या खेळाचा सराव" असतो. भातुकलीप्रमाणे त्यातील अन्नरस कल्पित असतो. ही विदारक स्थिती पीएच. डी. व त्यानंतरच्याही संशोधन प्रकल्पांबद्दल वेळोवेळी उजेडात आली आहे. सर्वच्या सर्व ज्ञानशाखांमधून विद्यापीठ स्तरावर.

या पार्श्वभूमीवर डॉ. इंदापूरकरांचे निगर्वी, परिश्रमी आणि नम्रपणे आपण सतत अजून अपूर्ण असे विद्यार्थीच आहोत असे मानणारें व्यक्तिमत्त्व या पुस्तकातून प्रतीत होते त्याचा विशेष उल्लेख करावासा वाटतो.

१२५/१ अ, मयूरेश सोसायटी, पौड रस्ता, पुणे – ४११ ०३८

## सूचना फलक

### चुकीची दुरुस्ती

भाषा आणि जीवनच्या वर्ष ७ अंक १ (हिवाळा १९८९) या अंकात पृ. १५ वर डेक्कन कॉलेजचे भूतपूर्व संचालक डॉ. सुमित्र कत्रे यांच्या नावाचा निर्देश डॉ. सुमंत कत्रे असा झालेला आहे. तो अर्थात्‌च चूक असून लेखिकेच्या अनवधानानें झालेला आहे, हे स्पष्ट आहे. डॉ. कत्रे यांचे बरोबर नाव सुमित्र मंगेश कत्रे असे असून पत्रिकेतील चुकीच्या निर्देशाबद्दल दिलगीर आहोत. चूक निदर्शनास आणून दिल्याबद्दल डॉ. नरेश कवडी यांचे आभार.

### पत्रिकेच्या लिफाफ्यावरील इंग्रजी

मुंबईच्या श्री. नरेन्द्र म. आपटे यांनी 'भाषा आणि जीवन'च्या हिवाळा १९८९ या अंकाच्या लिफाफ्यावरील रोमन लिपीतून लिहिलेल्या पत्त्याबद्दल खुलासा विचारलेला आहे. लिफाफ्यांवर पत्ते लिहिणाऱ्या नेहमीच्या व्यक्तीऐवजी दुसऱ्या नव्या व्यक्तीने हे काम केल्यामुळे हा बदल झालेला आहे. तो धोरणात्मक बदल वगैरे समजू नये. इतरांच्या लिफाफ्यांवर नेहमीप्रमाणे देवनागरी लिपीतच पत्ते लिहिले गेले आहेत. महाराष्ट्राबाहेरील पत्त्यांच्या बाबतीत मात्र रोमन लिपीतच पत्ते लिहिण्याचे आमचे धोरण आहे. अंक लवकर पोचण्याची शक्यता लक्षात घेऊन हे सोयिस्कर धोरण ठरवले आहे.

### बालादपि...

अमेरिकेत एका शाळेत मुलांना निबंधाला विषय 'इन्फिनिटी' (अनंतत्व) असा दिला होता.

"अनंतत्व म्हणजे शाळेत किती पाने गृहपाठ देतात ते. ... अनंतत्व म्हणज सगळ्यात एकदाची शांतता नांदायला किती काळ लागणार आहे तो.' एका मुलाने लिहिले.

संदर्भ : एली माओर, टु इन्फिनिटी अँड बियाँड, बॉस्टन १९८६





अनुक्रमणिका

## पैसे भरण्याबद्दल सूचना

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक ' मराठी अभ्यास परिषद ' या नावाने काढावा. मनीऑर्डर कूपनवर किंवा चेकसोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम, आणि ती कशापोटी पाठवली ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत २ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

## पत्रिकेची वर्गणी

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. सध्या-तरी त्यांची आकारणी वर्गणीच्याच दरात करण्यात येते. ती पुढीलप्रमाणे :

चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ३० रु.

चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यांसाठी वर्षाला ४० रु.

सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो की मागील वर्षांपैकी असो) १० रु.

मागील अंक मागवताना वर्ष १ (१९८३) मध्ये फक्त दोन अंक निघाले, वर्ष २ (१९८४) पासून मात्र दर वर्षाला चार अंक निघाले हे लक्षात घ्यावे.

## परिषदेची वर्गणी

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यांपैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ १५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ, एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ३० रु. + १५ रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी २०० रु. (परदेशी अंक पाठवायचा असल्यास शिवाय १०० रु.); देणगीदारासाठी ५०० रु. किंवा जास्त; आश्रयदात्यासाठी १००० रु. किंवा जास्त. (आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

## जाहिरातीसाठी दर

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरणपृष्ठ चार १००० रु., आवरणपृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.



अनुक्रमणिका

नोंदणी क्रमांक : 040048/83

## महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
### इतिहासावरील प्रकाशने

| अ. क्र. | प्रकाशनाचे नाव | लेखक / अनुवाद | किंमत रु. |
|---|---|---|---|
| १. | महाराष्ट्रातील दप्तरखाने [ सुधारित द्वितीयावृत्ती ] | डॉ. वि. गो. खोबरेकर | ५२ |
| २. | महाराष्ट्रातील पुरातत्त्व | ह. धी. सांकलीया | १८ |
| ३. | सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास व कोरीव लेख | म. म. वा. वि. मिराशी | ५५ |
| ४. | History & Inscription of the Satvahanas and the Western Kshatrapas. | —,,— | ७८ |
| ५. | Studies in Ancient Indian History. | —,,— | २८ |
| ६. | Portuguese Maharatta Relations [ डॉ. पी. एस. पिसूर्लेकर लिखित "पोर्तुगीज–मराठे संबंध" या पुस्तकाचा अनुवाद ] | श्री. त्र्यं. वि. पर्वते | ४३ |
| ७. | असे होते मोगल [ निकोलाय मनुची लिखित "Storia-Do-Mogor" चा अनुवाद ] | श्री. ज. स. चौबळ | ४५ |
| ८. | उत्तरकालीन मोगल खंड– १ [ डब्ल्यु. आयर्विन लिखित "Latter Mughals" चा. अनुवाद. ] | श्री. प्र. गो. ठोंबरे | २८ |
| ९. | दुसरे महायुद्ध ( सर विन्स्टन चर्चिल लिखित "The Second World War" चा अनुवाद | वि. वा. कुवाडेकर | ७१ |
| १०. | French Records Vol. I to IX [ मूळ फ्रेंच कागदपत्रांचे मराठी भाषांतर ] | डॉ. वि. ग. हटाळकर | ३१८ [ ९ खंडांची किंमत ] |

**साहित्य आणि संस्कृती मंडळाची प्रकाशने खालील केंद्रांवर मिळतील :**

१. प्रकाशन व्यवस्थापक, शासन मुद्रण व लेखन सामग्री विभाग चर्नी रोड, मुंबई ४०० ००४

२. व्यवस्थापक, शासन लेखन सामग्री आणि ग्रंथागार, शहागंज, गांधी चौक, औरंगाबाद ४३१ ००१

३. व्यवस्थापक, शासकीय ग्रंथागार, बडवे बिल्डिंग, पी. वाय्. सी. जिमखाना, पुणे ४११ ००४

४. व्यवस्थापक, शासन मुद्रण व ग्रंथागार, सिव्हिल लाईन्स, नागपूर ४४० ००१